# विवेक जागर

प्रत्येक व्यक्तीला विवेकशक्ती लाभलेली आहे. त्या आधारे आपल्या भोवतालच्या परिस्थितीचे ज्ञान ती स्वतः मिळवू शकते. त्याबरोबरच स्वतःच्या कर्तृत्वाने व निर्धाराने त्यात बदलही घडवून आणू शकते. हे सांगणारी सत्यशोधकी विचाराची एक प्रभावी परंपराही महाराष्ट्रात होती. वैज्ञानिक दृष्टिकोनावर आधारित, विवेकवादी जीवनमूल्ये जोपासणारा, शोषणरहित समाज उभारण्याचा संकल्प सत्यशोधकी विचारापासून ते भारताच्या संविधानापर्यंत केला गेला आहे. जाती निर्मूलन, धर्मचिकित्सा, स्त्री-पुरुष समता, श्रमाची व कष्टकऱ्याची प्रतिष्ठा, व्यसनमुक्त समाज हे सर्व याच विचाराचे पैलू आहेत. या विवेक जागराची परिणामकारक मांडणी या पुस्तकाच्या विवेचनात आढळेल.



विज्ञान. निर्भयता. नीती

महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती



# विवेक जागर

कृतज्ञता

या पुस्तकाच्या निर्मितीस **यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई** यांनी उदारपणे आर्थिक सहाय्य केले आहे. महाराष्ट्र अंधश्रध्दा निर्मूलन समिती त्यांची मनःपूर्वक आभारी आहे.

## विवेक जागर

**लेखक** : **नरेंद्र दाभोलकर**
१९, गुरुकृपा हौसिंग सोसायटी, गोडोली, सातारा.



**प्रथमावृत्ती** : **डिसेंबर २००१**

**द्वितीयावृत्ती** : **डिसेंबर २००३**

**प्रकाशक व वितरक** : **मच्छिंद्रनाथ मुंडे**
ओम विश्वेश्वर दर्शन अपार्टमेंट,
ठाकूरवाडी, डोंबिवली (प.) जि. ठाणे

**मुद्रक** : **पुजा प्रिंटर्स**
डोंबिवली (प.)

**संगणक** : **प्रशांत गुजर**
टाईप इनोव्हेटर्स
१९५, सदाशिव पेठ, मोती चौक, सातारा. फोन : ३४३७२

**मुद्रितशोधन** : **प्रशांत सिदवाडकर**

**मूल्य** : **दहा रुपये**

वैज्ञानिक दृष्टिकोन जोपासणे, हे भारतीय घटनेत प्रत्येक नागरिकाचे कर्तव्य सांगितले आहे. जनजीवनातील प्रत्यक्ष चित्र मात्र विपरीत दिसते. सहा वर्षांपूर्वी गणपतीरायाने दुग्ध प्राशन चालू केले, हा कथित चमत्कार अवघ्या तासाभरातच जगभर पोचला. अगदी अलीकडे विद्यापीठ अनुदान आयोगाने वैदिक फलज्योतिष व वैदिक पौरोहित्य हे विषय विद्यापीठात शिकवावेत, असे अधिकृत पत्र विद्यापीठांना पाठवले. या दरम्यान घडलेल्या अनेक घटनाही सांगता येतील. या सर्वांमागे एक सूत्रबद्धता आहे आणि काही विशिष्ट दीर्घकालीन उद्देश डोळ्यांसमोर ठेवून हे घडवले जात आहे, असेही मानता येईल; परंतु हा मुद्दा क्षणभर बाजूला ठेवू. महत्त्वाचे मुद्दे आणखी दोन आहेत. एकतर कथित धर्मरुढी, प्रथा, परंपरा, पूजा, व्रतवैकल्ये, सणवार, कर्मकांडे यांना समाजजीवनात जणू उधाण आल्याचे दिसत आहे. याचा अर्थ असा की, यासाठी नियोजनबद्ध प्रयत्न करणारे कोणी असेल तर त्यांना यश लाभत आहे आणि कोणी नसेल तर समाज भ्रमचित्त होऊन आपल्या कल्याणासाठी चुकीच्या मार्गाने चालला आहे. याहीपेक्षा गंभीर मुद्दा असा की, या वातावरणाला उत्तर देण्याचे प्रभावी प्रयत्न आजतरी महाराष्ट्रात दिसत नाहीत. विशेषतः शिक्षण क्षेत्राची याबाबत सर्वाधिक जबाबदारी आहे. महाराष्ट्रातील बहुतेक शिक्षण संस्थांना बहुजन समाजाच्या हिताची एक परंपरा आहे. उद्याचे राष्ट्र घडवणारी संवेदनशील तरुण मने येथे वावरतात; परंतु वैज्ञानिक दृष्टिकोनाची, सत्यशोधकी जाणिवांची ऐशी की तैशी करुन टाकणाऱ्या वातावरणाचा प्रतिवाद करण्यासाठी महाराष्ट्रातील शिक्षण क्षेत्र सरसावले आहे, असे दिसत नाही. उलट 'सारे कसे शांत शांत' अशी स्थिती आढळते. विद्यापीठ अनुदान आयोगाने 'ज्योतिर्विज्ञान' या नावाने फलज्योतिष शिकवण्याची विद्यापीठांना शिफारस केल्यावर त्याबाबतची प्रतिक्रिया भारताच्या तुलनेने महाराष्ट्रात कमी उशिरा उमटली आणि शिक्षण संस्थांच्या पातळीवर तर ती फारच कमी होती. एकतर असे आग्रह धरावयास हवेत, याची जाणीव होत नसावी अथवा त्याबाबत हतबलता जाणवत असावी. डाव्या चळवळीची आणि सत्यशोधकी परंपरा ज्या नगर जिल्ह्यात आहे तेथील एका तालुक्यात पुरोगामी वृत्तीचे संचालक असलेल्या महाविद्यालयात भाषणासाठी गेलो होतो. भाषणापूर्वी प्राचार्यांच्या खोलीत संस्थेच्या संचालकांच्या सोबत बोलणे चालले होते. 'मी काय बोलू असे आपणास वाटते ?' मी प्रश्न केला. आलेले उत्तर व सांगितलेला अनुभव वेगळा होता. "डॉक्टर तुम्ही तुम्हास हवे ते बोला; परंतु एका मुद्यावर मात्र बोलाच. सध्या आमच्या तालुक्यातील प्रत्येक गावी एकच कार्यक्रम धुमधडाक्यात होतो. तो असतो नाम सप्ताहाचा, गाथा पारायणाचा अथवा मंदिर जिर्णोद्वार किंवा गावात नवीन देऊळ बांधण्याचा. यासाठीची वर्गणी अक्षरशः लाखो रुपयांच्या रकमेत उभी राहते. त्याला विरोध करणे म्हणजे पाण्यात राहून माशाशी वैर.

एवढे पैसे वर्षभरात गोळा झाले की दुसऱ्या कोणत्याही सार्वजनिक कामाला पैसे मिळणेच अशक्य होते. मग ते काम गावातील शाळेच्या खोल्या बांधण्याचे असो, गावच्या स्वच्छतेचे असो वा 'माती आडवा पाणी जिरवा' असो. हे कार्यक्रम करावयास आमचा विरोध नाही; परंतु तालुक्यात जणू स्पर्धा लागावी, या पद्धतीने एकमेकांहून चढया स्वरुपात हे कार्यक्रम घेतले जातात. विकासाचे बाकिचे सर्व मुद्दे बाजूला पडतात.'' व्याख्यानाला विद्यार्थ्यांची बरीच गर्दी होती. आजूबाजूच्या अनेक खेडयांतून ते आलेले होते. मी त्यांना या मुद्याचा संदर्भ देऊन म्हणालो, ''गावात ज्यावेळेला सप्ताहासाठी वा मंदिरासाठी पट्टी निघेल, त्यावेळेला जमलेल्या रकमेतील शेकडा ५० टक्के तरी गावाच्या शिक्षणासाठी, स्वच्छतेसाठी, विकासासाठी खर्च केले पाहिजेत, असा आग्रह तुम्ही आणि तुमची शिक्षण संस्था यांनी का धरु नये?'' महाराष्ट्रात फिरताना मला सर्वत्र ही गोष्ट जाणवली आहे की, एखाद्या योग्य बाबीसाठी आग्रह धरावयाचे व निर्भिडपणे झुंजावयाचे, ही वृत्ती समाजसुधारकांच्या महाराष्ट्रात आता लोप पावत चालली आहे. वैज्ञानिक दृष्टिकोन रुजवणे याबाबत तर हे फार प्रकर्षाने जाणवते.

### एकविसाव्या शतकाच्या उंबरठयावर

समाजसुधारकांचा भरभक्कम वारसा असलेला महाराष्ट्र आणि विज्ञान तंत्रज्ञान व मनुष्यबळात जगात तिसरा क्रमांक असलेला भारत देश यामध्ये आजही बहुसंख्य लोकांची मानसिकता कशी आहे, याचे एक विदारक चित्र अगदी अलीकडेच बुलढाणा जिल्ह्यातील जिल्हा स्थानकापासून अवघ्या २५ कि.मी. अंतरावर असलेल्या पिंपळगाव सराई गावाशेजारच्या सैलानी बाबाच्या दर्ग्याने समोर आले आहे. हजरत हाजी अब्दुल रहेमान उर्फ सैलानी बाबा हे शंभर वर्षांपूर्वी या भागात राहत आणि दवा व दुवा यांच्या सहकार्याने अनेकांच्या तक्रारी दूर करत. १९०७ पासून त्यांच्या समाधीस्थळी वार्षिक उरुस भरु लागला व एरवीदेखील दर्ग्याला उपचार केंद्राचे रुप प्राप्त झाले. सैलानी बाबाच्या समाधीने दर्शन व दर्ग्यावरील मांत्रिकांनी दिलेले पाणी, लिंबू, धागा, दोरा, उदी, मंत्र आदींच्या साह्याने असाध्य रोगांवर ते उपचार करतात. भूत लागणे, बाहेरचे वारे लागणे, भ्रमिष्टासारखे होणे अशा अनेकविध प्रकारच्या रुग्णांना त्यांचे नातेवाईक याठिकाणी घेऊन येतात. हे सर्व रुग्ण खरेतर हिस्टेरिया, मॅनिया स्किझोफ्रेनिया या आजाराचे असतात. महिलांची संख्या जास्त असते. रुग्ण महिला सतत बरळत असतात. केस मोकळे सोडून चित्रविचित्र आवाज काढत स्वतः भोवती फिरत असतात. कधी–कधी अंगावरचे कपडे फाडून सैरावैरा धावत असतात. या रुग्णांना दर्ग्यावरचे मांत्रिक बेडया ठोकतात आणि मारहाण करुन, केस ओढून, जमिनीवर आदळआपट करुन अंगाखांद्यावर, डोक्यावर लिंबू कापून पाणी भरुन देऊन, अंगारा देऊन उपचार करतात. इलाज करणारे रुग्ण चार ते सहा महिन्यांपर्यंत उघडयावर राहतात अथवा फक्त नावाला आडोसा देणाऱ्या तट्टयाच्या झोपड्या महिना ७०० ते ८०० रु. भाड्याने घेतात. महिनोमहिने मांत्रिकाच्या उपचाराचा परिणाम व बाबांची दुवा याची वाट पाहण्यात वाया जातात. छोट्या आजाराचे रूपांतर मोठ्या आजारात होते. काही नातेवाईक पैसा संपल्यावर मनोरुग्णांना सोडून गावाकडे पोबारा करतात. यावर्षीच्या यात्रेला पाच लाख लोक जमा झाले होते. त्या कालावधीत १० मनोरुग्ण मांत्रिकाच्या अघोरी उपचारामुळे व अन्न-पाण्यावाचून तडफडून मृत्यू झाल्याची माहिती समोर आली आहे. अशा परिस्थितीतही मांत्रिकांची दहशत व नातेवाईकांचे अज्ञान कायम आहे. विदर्भाला शिक्षणाची व सत्यशोधकी विचाराची मोठी परंपरा आहे; परंतु अशा शब्दशः अघोरी गोष्टीबाबत कोठे हस्तक्षेप झालेला दिसत नाही.

विलक्षण वेगाने विज्ञानाची दौड चालू आहे. निसर्गाचे नियम माणसाला समजू शकतात व त्या ज्ञानाचा उपयोग तो स्वत:साठी करू शकतो, ही कल्पना ऐतिहासिकदृष्ट्या तशी नवीनच आहे. या कल्पनेचे डोळे दिपवून टाकणारे आणि मन विस्मित करणारे आविष्कार आपण पाहत असतो. एका बाजूला अणूच्या गर्भातील कणांची संरचना व कार्य, तर दुसऱ्या बाजूला अवकाशातील प्रचंड तारकापुंज आणि सुपरनोव्हा याबद्दलची माहिती विज्ञान आपल्याला देते. अत्यंत वेगवान व महाकाय विमाने, भूस्थिर उपग्रह, इलेक्ट्रॉनिक्सच्या तंत्रामुळे आकाशवाणी व दूरदर्शनद्वारे घराच्या खोलीत छोट्या पडद्यावर आलेले सगळे विश्व, जगभर सहजसुलभपणे पोचणारे दूरसंदेशवहन, या साऱ्यांमुळे सारे जग एक छोटे गाव वाटू लागले यात शंकाच नाही. पेशीय जीवविज्ञान, प्रतिजैविके यांमुळे वैद्यकीय विज्ञानात झपाट्याने प्रगती झाली. अन्नधान्याचे अधिकाधिक उत्पादन देणारी बियाणे, खते, कीटकनाशके, अत्याधुनिक शेतीपद्धती यामुळे मानवी इतिहासात प्रथमच भूकेवर विजय मिळविणे माणसाच्या शक्यकोटीत आले. संगणकशास्त्र व माहिती विज्ञानाच्या क्षेत्रात ज्या झपाट्याने रोजची दरमजल सुरू आहे, त्यामुळे तर आश्चर्याने तोंडात बोट घालणेही विसरून जाते.

आपल्या समाजातील विद्यार्थ्यांना अधिक चांगले विज्ञानशिक्षण मिळण्याची फार आवश्यकता आहे. यातून उद्याच्या पिढीतील शास्त्रज्ञ, तंत्रज्ञ आणि कुशल कामगार अधिक चांगले बनतील. त्याचप्रमाणे सर्वच जनतेच्या मनात विज्ञानाबद्दल विश्वास उत्पन्न होण्यास मदत होईल. आपल्या समाजात अधिक कुशल शास्त्रज्ञ, तंत्रज्ञ इत्यादी तयार झाल्याने आपल्या औद्योगिक, शेतकी, आरोग्य आणि एकंदरच आर्थिक प्रगतीला मदत होईल. या प्रगतीच्या प्रभावाने आणि त्यातील सामान्य माणसाच्या सहभागामुळे अनेक परंपरागत कमीजास्त हानिकारक रूढी हळूहळू गळून पडू लागतील. त्यासाठी वेगळ्या अंधश्रद्धाविरोधी प्रचाराची गरज नाही, अशी आपली कल्पना होती. वस्तुस्थितीत विज्ञानाची सृष्टी चारीबाजूने हरघडीसाठी अंगणात येऊन दाखल होत असताना विज्ञानाच्या दृष्टीपासून शतयोजने दूर राहणारे आणि त्यात अभिमान मिरवणारे जनमानस हे खरे आश्चर्य आहे. अजूनही लंगोटी लावणाऱ्या

आदिवासींपासून ते महानगरी मुंबईच्या गगनचुंबी इमारतीतून आंतरराष्ट्रीय व्यापार करणाऱ्या उद्योगपतीपर्यंत आणि नुकतीच समज येऊ लागलेल्या सात वर्षांच्या बालकापासून सत्तरीत पोचलेल्या परिपक्व, प्रौढ, वयस्क व्यक्तीपर्यंत धर्म, जात, लिंग, भाषप्रदेश असा कोणताही अपवाद न करता आपापल्या पातळीवर, आपापल्या सोयीनुसार अंधश्रद्धा मानणारे आणि त्याचे समर्थन करणारे लोक पाहिले की या अफाट [illegible] कोणता, अशी बळकट शंका मनात उत्पन्न होते.

नवस करावा तो फेडण्यासाठी [illegible] ठिकाणी पशुहत्या करावी, मेलेल्या व्यक्तीच्या पिंडा[illegible], याची वाट पाहत स्मशानात महत्त्वाचे तासनूतास वाया घालवत ताटकळत बसावे, वर्तणुकीत फरक पडल्यावर भूतबाधेची शंका घेऊन मांत्रिक वा भगताच्या आधीन व्हावे, अचानक पेटणारे कपडे, पडणारे दगड, अंगावरच्या बिब्याच्या फुल्या याला भानामतीची करामत समजून भयग्रस्त बनावे, मृतात्म्याला प्लँचेटच्या वाटीवर बोलावून प्रश्नांची उत्तरे मागावीत, आयुष्यातील सारे महत्त्वाचे निर्णय, थोतांड असलेल्या जन्मपत्रिकेच्या दावणीला बांधून, नियतीवादी बनावे, मुलगा होण्यापासून ते अखिल विश्वाचे कल्याण होण्यापर्यंतच्या विविध हेतूंसाठी अन्नधान्याची नासाडी करत दोन हजार वर्षांपूर्वीचे यज्ञयागाचे स्तोम माजवावे, जातीच्या खानदानपणाच्या नावाखाली विधवा विवाहाला विरोध करावा, शरीरधर्म असणाऱ्या, मासिक पाळीत स्त्रीरोग तज्ज्ञानेही स्वत:ला अपवित्र समजावे, पावसाने ओढ घेतली तर राज्यपालाने परमेश्वराची प्रार्थना करण्याचा फतवा काढावा आणि हातातून वस्तू काढण्याचे चिल्लर चमत्कार करणाऱ्या आणि स्वत:च्या सहाय्यकालाही खुनापासून वाचवू न शकणाऱ्या कोण्या बाबाच्या पायावर राष्ट्र वाचवण्यासाठी पंतप्रधान आणि राष्ट्रपतींनी लोटांगण घालावे, ही सारी कोणत्या शतकाची चाहूल ? कशाची लक्षणे ? विज्ञानयुगाचा हा ढळढळीत पराभव नेमके काय दाखवतो ? तो का झाला ? का होत आहे ?

### मानवाचे वैशिष्ट्य

ज्ञान हा माणसाचा खास विशेष आहे. इतर प्राण्यांनी पर्यावरणाशी जुळवून घेतले. मानवाने स्वामित्व मिळवले. ही सारी प्रगती हजारो पिढ्यांची आहे. पकड घेता येईल, अशी रचना असलेल्या स्वत:च्या हाताने आणि निर्माण केलेल्या विविध हत्यारांनी आजूबाजूच्या निसर्गावर प्रक्रिया करता-करता माणसाचा मेंदू विकसित झाला. माणसाने भाषा निर्माण केली, जोपासली, वाढवली. उत्क्रांत स्वरयंत्र व मुखपोकळी हे मानवाचे खास वेगळेपण. माणसाने केवळ ज्ञानार्जनच केले नाही, तर भाषेच्या आधारे केलेले ज्ञान संक्रमण हे माणसाचे अभूतपूर्व वैशिष्ट्य मानावे लागेल. हाताचा व हत्यारांचा वापर, भाषेची निर्मिती आणि तर्कबुद्धीचा विकास या आधारे गरूडझेपेसाठी माणसाची पूर्वतयारी झाली.

सुमारे आठ हजार वर्षांपूर्वी मनुष्याने शेतीला प्रारंभ करून स्वत:चे अन्नधान्य निर्माण करायला व स्थिर जीवन जगायला सुरुवात केली. कापूस, लोकर यांपासून वस्त्र विणून तो स्वत:चे शरीर झाकू लागला. दगडाचा वापर करून ओबडधोबड घरे बनवू लागला. लोखंड, लाकूड, चिकणमाती याचा वापर करू लागला. अग्नीच्या वापराने अन्न शिजविणे, लाकडी ओंडक्यांची पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहतूक करणे, शिडीच्या बोटीने वाऱ्याच्या साहयाने प्रवास करणे यास हळूहळू सुरुवात झाली. विश्वविषयक काही प्राथमिक कल्पना व विश्वात कार्य करणाऱ्या अज्ञात शक्ती या संबंधीच्या कल्पनाही याच काळात अस्तित्वात आल्या. तर्कनिष्ठ विचारांचा अवलंब करून नैसर्गिक घटनांच्या आविष्काराचे कारण शोधण्याचे काम या काळात मुख्यत्वेकरून तत्त्वज्ञांकडून होई व व्यवहारात आढळणाऱ्या व अनुभवास येणाऱ्या गोष्टींचाच आधार घेण्याची प्रवृत्ती कारागिरात आढळून येई. मात्र, या दोन्हींचा मिलाफ घडवून आणण्याचे तुरळक प्रयत्नही होत असत.

भारतापुरता विचार केला तरी ख्रिस्ती सनाच्या तिसऱ्या व चौथ्या शतकात नागार्जून या विख्यात रसायनतज्ज्ञाचे 'रसरत्नाकर' व 'काल्कपुटतन्त्रम्' हे ग्रंथ प्रसिद्ध होते. गंधक, पारा, तांबे, चांदी, सोने, यांपासून तयार करण्यात येणाऱ्या रासायनिक संयुगांची माहिती व उपयोग त्यात वर्णिले आहेत. अर्थात त्याबरोबर या ग्रंथात गुह्यमंत्र, जादूक्रिया, किमया यांबद्दलचेही उल्लेख आहेत. विख्यात भारतीय ज्योतिर्विद वराहमिहीर हा देखील याच काळात होऊन गेला. त्याच्या 'बृहत् संहिता' या ग्रंथात सूर्य व सूर्यकुलातील ग्रहांची माहिती सापडते. याच दरम्यान होऊन गेलेल्या अमरसिंग या कोशकाराने वनस्पती व प्राणी या सजीवांच्या सवयी, वैशिष्ट्ये, जननप्रकार याची काळजीपूर्वक निरीक्षणे नोंदवून त्यांची वर्गवारी करण्याचा प्रयत्न केला आहे. शून्याचा शोध भारतात लागला. आर्यभट्ट व भास्कराचार्य यांच्या ग्रंथात गणिते व खगोलशास्त्र यांवरील महत्त्वाचे सिद्धांत आढळतात. मात्र, इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या अखेरीपासून भारतात 'गुरोर्वाक्य प्रमाणम् ' ही प्रवृत्ती वाढली आणि ज्ञान मिळवण्याची प्रवृत्ती कमी झाली.

ही सारी आधुनिक विज्ञानाचा उदय होण्यापूर्वीची माणसाची कमाई आहे. निरीक्षण, तर्कशुद्ध विचार व प्रयोग या आधुनिक वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वापर होण्यात दोन अडथळे प्रामुख्याने होते. पहिली अडचण ही की, कुशल कारागीर असलेल्या व्यवहारी व कृतिशील व्यक्तीमध्ये तर्कशुद्ध विचार व त्यासाठीची सम्यक दृष्टी यांचा अभाव असे. दुसरी महत्त्वाची अडचण म्हणजे नैसर्गिक घटनांबद्दलच्या माणसाच्या कल्पना त्या काळात बहुदा अस्पष्ट व डळमळीत तरी असावयाच्या, नाहीतर पूर्वग्रहदूषित तरी. विज्ञानाची रचना बुद्धागम्य असते. त्याचा गाभा इंद्रियांद्वारे येणारी वस्तुनिष्ठ प्रचिती हा असतो. इसवी सनाच्या पंधराव्या शतकात व त्या पूर्वीच्या काळात युरोपात राजा व धर्ममत यांना संमत असणाऱ्या मतावर विज्ञान अवलंबून होते. त्यामुळे वैज्ञानिक प्रगती तर खुंटलीच पण निसर्गाबद्दल कित्येक चुकीच्या कल्पना समाजात

रूढ झाल्या. उदा. पृथ्वी ही विश्वाच्या मध्यभागी आहे. देवाकडून मानवाची निर्मिती झाली. दिवसा माणसाला प्रकाश मिळावा व रात्री शीतल चांदणे मिळावे, यासाठी सूर्य-चंद्राची झुंबरे आकाशात लटकविली आहेत, वगैरे. त्या काळातले विज्ञान हे श्रद्धाधिष्ठित होते. विज्ञानाचा समन्वय हा एका बाजूला चर्चतर्फे सांगण्यात येणाऱ्या धर्मग्रंथांच्या ज्ञानाबरोबर तर दुसरीकडे चर्चची मान्यता असलेल्या आणि सर्वश्रेष्ठ ज्ञानी म्हणून गौरविलेल्या ॲरिस्टॉटलच्या मताबरोबर घालण्याचा आग्रह धरला जाई. त्यामुळे विज्ञानाला काहीशा बौद्धिक स्वरूपाच्या कसरतीचे स्वरूप प्राप्त होई.

### वैज्ञानिक दृष्टिकोनाचा प्रारंभ

हा काळ मागे पडून वैज्ञानिक दृष्टिकोनाचा प्रारंभ युरोपमध्ये सोळाव्या शतकाच्या दरम्यान झाला असे मानण्यात येते; परंतु तपासणीची विकसित यथायोग्य अचूक पद्धत हे त्याचे केवळ एक रूप आहे; त्याचा गाभा आहे प्रस्थापित मताला स्वतःच्या प्रज्ञेने निर्भयपणे आव्हान देण्यात आणि त्यासाठी मृत्युदंडापर्यंतच्या सोसाव्या लागणाऱ्या सर्व हालअपेष्टा हसतमुखाने स्वीकारण्यात. त्याची सुरुवात होते इ.स. पूर्व ३९९ साली अथेन्स नगरीच्या लोकसभेत सॉक्रेटिसवर चालवलेल्या अभियोगापासून. 'अखिल राष्ट्राला मान्य असलेल्या देवता हा मानत नाही. रूढ नितीपासून तरुणांना च्युत करतो,' असे आरोप सॉक्रेटिसवर ठेवण्यात आले होते. वास्तविक सॉक्रेटिस देव मानत नव्हता असे नाही; पण प्रत्येकाने आपल्या विवेकबुद्धीच्या निकषावर कोणतेही तत्त्व, देवाचे अस्तित्वसुद्धा, पारखून पाहावे, असे तो सांगत असे. ज्ञान हा मोठा सद्‌गुण व अज्ञान हा अत्यंत घातक दुर्गुण हा विचार तो आपल्या शिष्यांना सांगे. गूढ दैवी शक्तीचा म्हणजे देवांच्या वचनाचा आधार नीतिकल्पनांना आवश्यक नाही. ऐतिहासिक, सामाजिक अनुभवांवरून नीतिनियम ठरवावे, असा त्याचा आग्रह होता. बुद्धीचा निकष लावल्याबरोबर प्रस्थापित ज्ञान व नीतितंत्त्व यावरची श्रद्धा ढळणे अपरिहार्यच होते. सनातनी लोकांच्या मते आणि समाजधुरिणांच्या मतेही याचा अर्थ पाखंड माजवणे असाच होता. सॉक्रेटिसला न्यायालयासमोर खेचण्यात आले आणि विषाचा प्याला रिचवण्याची शिक्षा फर्मावण्यात आली. आपल्या विवेकबुद्धीचा आवाज व आग्रह कायम ठेवण्यासाठी सारे स्वजन आणि समाज यांच्याविरुद्ध उभे राहण्याचे हे धैर्य ज्या समाजात ज्या प्रमाणात प्रगटले त्या- त्या प्रमाणात अंधश्रद्धेची जोखडे झुगारणे आणि विज्ञानाची कवाडे उघडणे त्या-त्या जनजीवनात शक्य झाले. आपल्या मतासाठी मृत्यू पत्करावयाची ही संस्कृती सॉक्रेटिसने प्रथम जगात आणली. सॉक्रेटिसची ही परंपरा मध्यंतरी काही शतके लुप्त झाली होती आणि त्याबरोबरच युरोपची प्रगतीही कुंठित होऊन बसली होती. जगातील देशांचा इतिहास हेच दाखवितो की स्वतंत्र चिंतन, अवलोकन, अनुभूती व त्याआधारे ज्ञान यांना ज्या प्रमाणात ज्या क्षेत्रात अवसर मिळतो त्या प्रमाणात त्या क्षेत्रात समाजाचा उत्कर्ष होतो. हे स्वतंत्र चिंतन, संशोधन, थबकलेला काळ हा त्या देशाच्या संस्कृतीच्या तमोयुगाचा असतो. चौथ्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत युरोपची हीच स्थिती होती.

### भारतातील वाटचाल

विज्ञान विषयाचे शिक्षण देणे, विज्ञान तंत्रज्ञान वापरणे आणि वैज्ञानिक दृष्टिकोन समजून घेणे व रुजविणे या अगदी भिन्न आणि परस्पर संबंध नसणाऱ्या घटना झाल्याचे आजचे दृश्य आहे. विज्ञान शाखेतील पदवीधर स्त्री-पुरुषांच्या वर्तनावरूनही हे दिसून येते आणि काहीजण आपल्या वैज्ञानिक ज्ञानाचा उपयोग अवैज्ञानिक दृष्टिकोनाचा प्रसार करण्यासाठी करतात.

विश्व, विश्वाची रचना, उत्पत्ती, विकासप्रक्रिया यातील मानवाचे स्थान याकडे पाहण्याचे वेगवेगळे दृष्टिकोन प्रचलित आहेत. ते मुख्यतः ज्ञेयवादी व अज्ञेयवादी या गटांत विभागले जातात. वैज्ञानिक दृष्टिकोन हा ज्ञेयवादी गटातील दृष्टिकोन आहे. भौतिकवाद, इहवाद ही त्या आधारावर प्रतिपादन करण्यात आलेली तत्त्वज्ञाने आहेत. याउलट अध्यात्मवाद, देववाद, दैववाद ही अज्ञेय गटातील तत्त्वज्ञाने आहेत. समाजमानस व शिक्षणपद्धतीही आज याच तत्त्वज्ञानाच्या प्रभावाखाली आहे.

अनुभवाचा अर्थ लावण्याची कुवत निर्माण करणे म्हणजे वैज्ञानिक दृष्टिकोन वाढवणे व अंधश्रद्धा निर्मूलन करणे. अनुभवाचा अर्थ लावणे म्हणजे त्याची गोळाबेरीज वा सरासरी नव्हे तर नैसर्गिकरीत्या अनुभवात खूप गुंतागूंत असते ती सोडवून शुद्ध स्वरूपात अनुभव घेणे, याला प्रतिभा लागते. उदा. दगड व पीस एकाच उंचीवरून सोडल्यास दगड लगेच व पीस हळूहळू तरंगत खाली येते. हवेचा रोध काढल्यास ते दोन्ही एकाचवेळी जमिनीवर पोचतील. हे समजण्याची अपवादात्मक प्रतिभा एखाद्याकडेच असणार; परंतु आज केवळ प्रतिभासंपन्न व्यक्तीपुरतेच मर्यादित असलेले ज्ञान उद्या सामान्यविज्ञान होते. हीच वैज्ञानिक दृष्टिकोनाची महती आहे.

भारत सरकारने ४ मार्च १९५८ ला शास्त्रीय धोरणविषयक ठराव तत्कालीन पंतप्रधान जवाहरलाल नेहरू यांच्या प्रेरणेने मंजूर केला. त्यातील महत्त्वाचा भाग असा; 'वैज्ञानिक दृष्टिकोन व शास्त्रीय ज्ञान यांचा उपयोग करूनच समाजातील प्रत्येकाला भौतिक सुविधा देता येतील. संस्कृतीची वाढ व प्रसार यांबाबत विज्ञानाने अभूतपूर्व योगदान केले आहे. पूर्वी जे अशक्य वाटत होते ते आज शक्य झाले आहे ते विज्ञानाच्या नेतृत्वामुळेच....विज्ञानाने विचार करण्याची नवी साधने दिली व मानवी बुद्धीची क्षितिजे मोठ्या प्रमाणात विस्तीर्ण केली. विज्ञानाने जीवनाच्या मूलभूत मूल्यांवर प्रभाव टाकला आहे व संस्कृतीला एक नवा जोम, नवी गतिशीलता प्राप्त करून दिली आहे. १९७५ मध्ये इंदिरा गांधींनी घटना दुरुस्ती करून नागरिकांची मूलभूत कर्तव्ये हा भाग त्यात समाविष्ट केला. (विभाग ४ अ कलम ५१ अ) या कर्तव्यांच्या यादीत

शास्त्रीय दृष्टिकोनाचा, मानवतावादी विचारांचा विकास करणे, चौकस बुद्धी वाढविणे यांसाठी मनोवृत्ती सजग ठेवणे, हे भारतीय नागरिकांचे प्रमुख कर्तव्य मानले आहे. १९८७ मध्ये राजीव गांधींच्या नव्या शैक्षणिक धोरणात 'वैज्ञानिक दृष्टिकोन' हा शब्द आग्रहाने आला.

## विज्ञानदृष्टीची काही वैशिष्ट्ये :

१) कोणत्याही अधिकारी व्यक्तीने सांगितले म्हणून अथवा ग्रंथात लिहिले म्हणून खरे मानणे चूक आहे. सत्याचा अंतिम निकष म्हणजे प्रत्यक्ष प्रमाण व निरीक्षण.

२) विश्व विशिष्ट नियमांनी बद्ध आहे. या नियमाचे ज्ञान प्रयोग, तर्क व पडताळा या पद्धतीने मिळते. विज्ञानाचा विषय असणारे भौतिक जग माणसाच्या जाणिवेच्या बाहेर स्वतंत्रपणे अस्तित्वात आहे, हे निश्चित अशा नियमबद्ध प्रक्रियेमधून बदलत असते. या जगाला हे जे स्वयंभू अस्तित्व आहे, नियमबद्धता, गतिमानता आहे ती बाहेरच्या कोणत्याही ईश्वरी शक्तीमुळे लाभलेली नाही तर तिचे स्पष्टीकरण या जगातील वस्तू, घटना यांच्या व्यापारातून शोधायला हवे. माणूस या जगाचा भाग आहे. त्याच्या जाणिवेला जगाचे ज्ञान होण्याची क्षमता आहे. ही क्षमता कोण्या ईश्वराच्या कृपेमुळे त्याला येत नाही तर त्याच्या व्यवहाराचे स्वरूपच असे आहे की त्याला ती येते.

३) पृथ्वी हा विश्वाचा केंद्रबिंदू नाही. मानवासाठी हे विश्व निर्माण झालेले नाही. कोणत्याही सुष्ट व दुष्ट शक्तीच्या प्रार्थनेतून विश्वातील कार्यकारणभावाच्या नियमात काहीही फरक पडत नाही. विश्वनिर्मितीचा हेतू ही कल्पना विज्ञानाला मान्य नाही. ''या विश्वातील चराचर वस्तुमात्र आणि प्राणिमात्र याची निर्मिती केली आहे, केली जात आहे. त्याचा कोणी ना कोणी कर्ता आहे. तो या निर्मिती प्रक्रियेच्या बाहेरून ती घडवत आहे. तिचे नियंत्रण करत आहे, ती चालविणे वा थांबविणे हे केवळ त्याच्या हाती आहे, त्याच्या मर्जीवर अवलंबून आहे. त्यामागे त्या शक्तीचा काही हेतू आहे.'' या कल्पनांचा त्याग वैज्ञानिक दृष्टिकोनातून अपेक्षित आहे.

४) अंतिम व श्रेष्ठ ज्ञान बुद्धीच्या सातत्याने प्राप्त होत नसून साक्षात्कार वा अतिंद्रिय अनुभवां - द्वारा प्राप्त होते; ही तत्त्वज्ञान व धर्मविचारातील श्रद्धा वैज्ञानिक दृष्टिकोन साफ नाकारतो. साक्षात्कारी ज्ञान श्रेष्ठ मानण्याचा एक दुष्परिणाम असा होतो की, वस्तू व घटना यांच्याबद्दल शास्त्रीय व वस्तुनिष्ठ ज्ञान प्राप्त करून घेण्याचा आग्रह समाजातील बुद्धिमान लोकांत राहत नाही. दुसराही एक लोकशाही विघातक परिणाम होतो. साक्षात्कारी ज्ञान हे सर्वांनाच प्राप्त होऊ शकत नाही. ती एक विशेष प्रकारची सिद्धी आहे, असे मानले जात असल्याने समाजात ज्ञानी, अधिकारी पुरुष व सर्वसामान्य भक्तगण असे दोन वर्ग तयार होतात.

५) वैज्ञानिक दृष्टिकोनाची सिद्धता करण्यासाठी करावयाच्या प्रयोगात प्रयोगाच्या परिस्थितीवर पूर्ण ताबा असतो. अज्ञेय शक्ती आपोआप काही घडवून आणतील यावर वैज्ञानिक दृष्टिकोनाचा विश्वास नसतो. वैज्ञानिक सत्याच्या बाबतीत काटेकोर तपासणीनंतर एक जरी अपवाद केला तरी पत्त्याचा बंगला कोसळावा तसा विज्ञानाचा डोलारा कोसळून पडतो. एखाद्या सत्यसाईबाबाच्या मोकळ्या हातात जर आपोआप अंगारा व अंगठी निर्माण होऊ लागली तर ती घटना संपूर्णपणे अवैज्ञानिक ठरेल. अन्यथा विज्ञानाचे ज्ञात नियम ओलांडणारी अद्‌भूत शक्ती आपणाकडे आहे, हे सत्यसाईबाबा वा त्याप्रकारे चमत्कार करणाऱ्या अन्य कोणाही बाबास सिद्ध करावे लागेल.

६) विज्ञान हे सार्वजनिक असते. वैज्ञानिक सत्य सर्वांसाठी खुले असते. ज्या कोणाला त्याविषयी कुतूहल असते त्याला ते तपासून घेता येते. वैज्ञानिक दृष्टिकोनाला मताभिनिवेश (डॉगमॅटिझम) मंजूर नसतो. कारण मताभिनिवेशाचे स्वरूप व्यक्तिनिष्ठ असते आणि त्याचा पाया पूर्वग्रह हा असतो. श्रद्धाधिष्ठित मत वैयक्तिक स्वरूपाचे असते असे वैज्ञानिक दृष्टिकोन मानतो. वैज्ञानिक दृष्टिकोन एखाद्या आविष्काराचा खुलासा व आकलन करू शकतो; परंतु तो वस्तुनिष्ठ असतो, व्यक्तिनिष्ठ असतो.

७) विज्ञान हे नेहमीच नम्र असते. मी सांगितलेला शब्द शेवटचा, माझा निष्कर्ष अंतिम असा दावा विज्ञान कधीही करत नाही. मला सर्व काही समजले आहे, विश्वाचे कोडे उलगडले आहे, सर्व ज्ञान प्राप्त झाले आहे, आता फक्त माझ्या आदेशाचे पालन करा, असे धर्म सांगतो. विज्ञानाचे मत, वस्तू, घटना तपासावयाच्या, न समजलेल्याचा शोध चालू ठेवायचा; व्यवहार मात्र सिद्ध झालेल्या सत्याच्या आधारेच करावयाचा असे असते. शास्त्राचे प्रत्येक गृहितक हे स्वतःला तपासून घेण्याच्या आणि त्यामध्ये कसाला उतरले नाही तर नष्ट होण्याच्या निर्भयतेने उभे असते.

आपल्या समाजात आजघडीला वैज्ञानिक दृष्टिकोन नाही. समाजातील कमालीची निरक्षरता हे त्याचे एक (एकमेव नव्हे) महत्त्वाचे कारण आहे. शिक्षणामुळे वैज्ञानिक दृष्टिकोन विकसित होण्याला मदत होते. आज ही अपेक्षा पूर्ण होत नसली तरी ही अपेक्षा ठेवण्यात गैर नाही; नव्हे, शिक्षणाचे ते एक महत्त्वाचे उद्दिष्ट आहे. भारतातील ४९% जनता निरक्षर आहे आणि त्याबरोबरच विज्ञानविन्मुखता व अंधश्रद्धा यांची स्वाभाविक बळी आहे; परंतु ज्यांना शिक्षणाचा लाभ मिळतो, त्यांच्यामधूनही वैज्ञानिक दृष्टिकोन निर्माण होत नाही ही दुसरी बाजूही विचार करावयास लावणारी आहे. युवक वा कुमार गटातील मुलांवरचे आजचे संस्कार कोणते आहेत ? शिक्षणात विज्ञान असले तरी त्यामध्ये चिकित्सक व संशोधनात्मक अंग कमी व कमजोर आहे. धर्मात मानले गेलेले सर्व श्रेष्ठ आहे. आपली जात श्रेष्ठ वा कनिष्ठ आहे. यशापयश परमेश्वराच्या

हाती, मुहूर्त, पूजन, आशीर्वाद, देव-दैव, अवतार, वर-शाप, पाप-पुण्य, इहलोक-परलोक, स्वर्ग-नरक, तीर्थ-प्रसाद, पूजा-अर्चा, प्रार्थना-उपासना, गतजन्म-पुनर्जन्म, कर्मविपाक अशा अनेक अवैज्ञानिक कल्पना आजच्या शिक्षकांच्या मनात व संस्कारात बळकट आहेत व त्यांद्वारे विद्यार्थ्यांमध्ये त्या संक्रमिक होत असतात. अगदी सहजपणे या कल्पना शिकवल्या जातात. त्याकरिता खर्ची पडणारी प्रतिभा ही कुशलतेच्या श्रेणीतील समजण्यात येते. सोमवार शंकराचा, मंगळवार देवीचा, बुधवार विठोबाचा, गुरुवार दत्ताचा, शुक्रवार पुन्हा देवीचा, शनिवार मारुतीचा, रविवार ज्योतिबाचा असे विद्यार्थ्यांना शिकविण्यात येते. विष्णूला पांढरी व गणपतीला लाल फुले आवडतात, हे कळल्यावर विज्ञानाच्या जिज्ञासेचे फूल उमलण्याची शक्यताच उरत नाही.

विज्ञानधिष्ठित जीवनपद्धती म्हणजे रोकडेपणा, शुष्कता, भावनाशून्यता असाही एक समज हेतु:पुरस्सर वा अज्ञानाने पसरवला जातो. माणसाच्या व्यक्तिमत्त्वाची भावना ही एक समृद्ध व आवश्यक बाजू आहे. विरोध आहे तो सारासार बुद्धी गहाण टाकून भावनेच्या आहारी जाण्याला. मूल आजारी पडल्यावर विज्ञाननिष्ठा आई त्याला योग्य उपचार करेल. अंधश्रद्धाळू आई त्याशिवाय त्याला अंगारा लावेल, नवस करेल, उपास धरेल व बाबाचा मंतरलेला ताईत बांधेल. याचा अर्थ निव्वळ औषधोपचार करणारी आई भावनाविरहित असते असे थोडेच आहे ? मुलाची सारी सेवा ती अंतरीच्या उमाळ्याने करतेच; परंतु अंधश्रद्धेकडे भावना गहाण टाकणे नाकारते हे अधिक श्रेयस्कर नव्हे काय ?

शास्त्रामध्ये उच्च पदव्या मिळवलेली माणसे अवैज्ञानिक परंपरा निष्ठेने पाळतात आणि स्वतःला विज्ञानवादी म्हणवून घेणारे अभिमानीही प्रत्यक्ष आचरणात कच खातात. या दोन्हींमुळे वैज्ञानिक दृष्टिकोनाबद्दलच प्रश्नचिन्ह उभे करणे योग्य नव्हे.

शास्त्राचे ज्ञान मिळविणे आणि शास्त्रीय दृष्टिकोन स्वीकारणे, या दोन्ही वेगवेगळ्या गोष्टी आहेत. शास्त्रांचे अध्ययन केलेली व्यक्ती वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार करण्याची शक्यता अधिक आहे पण ती निश्चितपणे तसे करेलच असे मात्र नाही. वैज्ञानिक दृष्टिकोनाला आवश्यक असणारी स्वतंत्र विचारसरणी हा संस्काराचा भाग आहे. केवळ बुद्धिमत्ता त्यासाठी पुरेशी नाही. एखादी व्यक्ती हुशार असूनही स्वतंत्र विचारप्रवृत्ती तिच्यात नसेल तर दुसरी व्यक्ती सामान्य बुद्धीची असूनही चिकित्सक असू शकेल. शास्त्रीय ज्ञान यशस्वीपणे संपादित करणे हा केवळ व्यक्तीच्या बुद्धिमत्तेचा प्रश्न आहे पण शास्त्रीय दृष्टिकोन संपादन करणे हे मूल्य आहे आणि तो व्यक्तीच्या प्रवृत्तीचा भाग आहे. सामान्य माणसाला हे पेलवणारे नाही, त्याला धर्माचाच आधार पाहिजे हेही खरे नाही. धर्माची खरी शिकवण सामान्य माणसाला पेलणे हे त्याहूनही अवघड आहे.

वैज्ञानिक दृष्टिकोन बाळगणारा माणूस प्रत्यक्षात काहीवेळा अंधश्रद्धा, कर्मकांड यांचे पालन करताना आढळतो. त्या व्यक्ती एकतर अप्रमाणिक असल्या पाहिजेत किंवा प्रत्यक्ष व्यवहारात त्यांना मोठ्या प्रमाणात तडजोड करणे भाग पडत असले पाहिजे. विचार पटतात पण हितसंबंधविरोधात जाण्याचे धैर्य नाही अशी स्थिती शक्य आहे. या दोन्ही प्रकारच्या माणसांच्या उदाहरणावरून वैज्ञानिक दृष्टिकोन अपुरा आहे, असे मांडणे हे तर्कट होईल. खरा विज्ञाननिष्ठ माणूस ही तडजोड अपवादात्मकरित्याच करतो आणि ही तडजोड आहे, मूल्य नव्हे याची जाणीव बाळगतो.

विविध अनुभव एकत्र करून त्यांचा कार्यकारणभाव निश्चित करणे, त्यांचे सार काढणे ही कौशल्ये शिक्षणातील वैज्ञानिक दृष्टिकोनाचा महत्त्वाचा भाग आहेत. संशोधन आणि तंत्रविकासात काम करणाऱ्या व्यक्तींची एकूण संख्या लक्षात घेतली तर जगात आपला क्रमांक सहावा लागतो. देशातील प्रचंड दारिद्र्य आणि निरक्षरता पाहता ही बाब खास कौतुकाचीच म्हणावी लागेल. संशोधन तंत्रविकासावर आपला खर्च हजार ते पंधराशे कोटी आहे. या कौतुकास्पद बाबींच्या विरोधात जाणाऱ्या अनेक गोष्टी आहेत. त्यातील सर्वात महत्त्वाचा मुद्दा म्हणजे अनुभवाचे ज्ञानात रूपांतर करण्याची सवय सुटणे आणि त्याची सामाजिकता दुर्लक्षित होणे. व्यापक सामाजिक पातळीवर याचा वाईट परिणाम होतो. जगाच्या तोडीचे तंत्रज्ञान विकसित करू शकणाऱ्या देशात हवा, पाणी, अन्न, निवारा या मानवाच्या मूलभूत गरजा आहेत, हे वाक्य फक्त परीक्षेत वा तुळईवर लिहिले जाते. दूध, अंडी, साखर यांच्या निर्मितीत भारताचा नंबर जगात पहिला लागतो. असे असताना चाळीस टक्के जनता दारिद्र्यरेषेखाली जगते म्हणजे त्यांना शारीरिक कष्टासाठी आवश्यक असलेले उष्मांक अन्नातून मिळत नाहीत. हजारो कोटी रुपयांची महाकाय धरणे उभी राहत असतात, पण तीन लाख खेड्यांत पाणी मिळण्याची मारामार असते. मग स्वच्छ पाणी ही फार पुढची गोष्ट झाली. बहुजन समाजाला आरोग्यासाठी आवश्यक त्या फळांची निर्यात करून महागडी, श्रीमंतांनाच परवडतील अशी औषधे आयात केली जातात. हवा प्रचंड दूषित होते. जे बांधण्यासाठी कसल्याही परकीय वस्तूची वा तंत्रज्ञानाची गरज नाही . ते डोक्यावरचे छप्पर अनेकांना दुरापास्त राहते. उपलब्ध पाण्याचा नेमका वापर करून दारिद्र्य हटवता येते, हे फार नेमकेपणाने महाराष्ट्रात चार-पाच ठिकाणी तरी सिद्ध होऊनही त्या उत्तराचा पाठपुरावा होत नाही.

हे असे होते, कारण या प्रश्नांच्या सोडवणुकीची जबाबदारी असलेली माणसे मूर्ख, स्वार्थी वा देशद्रोही आहेत असे नाही. आपले निर्णय व कृती यांचा सामाजिक अन्वयार्थ लावण्याची क्षमता व दृष्टी आमच्याकडे अपवाद वगळता नव्हती आणि तो निर्माण होण्याची धडपडही आपण करत नाही.

आपले निर्णय व कृती यांचा सामाजिक अन्वयार्थ लावण्याची क्षमता गमावणे, हे झाले वैज्ञानिक दृष्टिकोनाकडे पाठ फिरवणे. त्यातून प्रश्नांची रास्त सोडवणूक लांब जाते. या

चुकीच्या उपायातून घडणारे परिणाम सोसणे आले की नशिबाला दोष देत बसावे, ही झाली प्रश्नांची दैववादी बाजू. दोन्ही चूकच आहेत व हातात हात घालून घात करणाऱ्या आहेत. त्यांच्या विरोधी संघर्ष हेच खरे अंधश्रद्धा निर्मूलन आहे, वैज्ञानिक दृष्टिकोन जोपासणे आहे.

**धर्मचिकित्सा व विवेकवाद**

मानवी जीवनात धर्माला एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. जगाच्या भूभागातील सर्व प्रकारच्या जनसमूहात मानवाच्या आदिम अवस्थेपासून या ना त्या स्वरूपात धर्माने माणसाची सोबत केली आहे. वैज्ञानिक दृष्टिकोनाचा उदय आणि विकास ही गेल्या चारशे वर्षांतील गोष्ट. संघटित धर्मांचा उदयही त्याआधी कित्येक शतके झाला होता. विज्ञानाचा उदय होण्याआधीच त्यांना विशाल स्वरूप आणि विलक्षण सामर्थ्य प्राप्त झाले होते. जीवनाचे सर्व आयाम धर्मकल्पनेच्या प्रभुत्वाने व्यापले होते आणि सर्व बाजूंनी त्याची जीवनावर अप्रतिहत सत्ता फार दीर्घकाळ चालली होती.

आपण लहानपणी भाषा शिकतो. धर्म तर आपणास जन्मत:च मिळतो. मायबोलीप्रमाणेच हा मायधर्म असतो. लहानपणीच धर्म संस्कार म्हणूनच आपण स्वीकारतो. धर्मविचार करण्याचा प्रयत्न तेथे उपस्थित होत नाही. व्यक्ती प्रौढ होते. विचार करण्याची, विवेकाची तिची क्षमता तयार होते. इतर धर्मांबरोबर स्वत:च्या मायधर्माची तुलना ती करू लागते, तेव्हा धर्मविचाराला प्रारंभ होतो. बहुतेकांच्या जीवनात हे घडत नाही.

महाराष्ट्रात अर्वाचीन काळात धर्म या विषयावर मनन, चिंतन व कृती करणारी काही माणसे मागच्या शतकात होऊन गेली. लोकहितवादी, महात्मा फुले, न्या. रानडे, लोकमान्य टिळक, पंडिता रमाबाई, डॉ. केतकर, वा. म. जोशी, राजर्षी शाहू महाराज, गाडगेबाबा, स्वातंत्र्यवीर सावरकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर या लोकांचे आपापल्या क्षेत्रात मोठे कार्य आहेच; परंतु त्याबरोबरच त्यांनी धर्माचा विचार केला, असे दिसून येईल. त्यांचे विचार, निष्कर्ष व कृती वेगवेगळ्या होत्या, त्या कोणाला पटतील वा न पटतील पण त्यांनी धर्माचा विचार आस्थेने व शोध घेण्याच्या बुद्धीने केला, हे मानावे लागेल.

धर्माचा अभिमान, अस्मिता व अहंकार अधिकाधिक बलवान करण्याचा प्रयत्न सध्या सर्वच धर्मांत चालू आहे. देवळात जाणे, यात्रा करणे, धर्माची व्याख्याने, प्रवचने, कीर्तने, देवतांचे व धर्माचे उत्सव या गोष्टींकडे त्या-त्या धर्मातील सर्वसामान्य समाजच नव्हे तर तरुण पिढीही आकर्षित झालेली दिसते. धर्माभिमान व धर्मविचार या वेगवेगळ्या गोष्टी आहेत. धर्माभिमानी माणूस धर्मविचार करू शकेल पण करेलच असे नाही. धर्माभिमानाला जास्तीत जास्त तीव्रता व धर्म विचाराला ओहोटी असे महाराष्ट्रातले आजचे स्वरूप आहे. अंधश्रद्धा निर्मूलनाची चळवळ प्रत्यक्ष कृतीच्या क्षेत्रात असल्याने आणि या विचारांचा संबंध हरघडी धर्माशी येत असल्यानेही धर्मचिकित्सा अपरिहार्यच बनल्याचे आम्हाला जाणवते.

विविध ठिकाणच्या आदिमानवाच्या सामाजिक जीवनात प्राथमिक धर्मभावना 'यातू' प्रधान होती. विश्वातील सर्वांत-माणसांत, प्राणिमात्रांत, निर्जीवांच्यात एक 'यातू' तत्त्व आहे. अशी धर्माची आदिम अवस्थेतील कल्पना होती. 'यातू' दोन प्रकारचे होते. व्यक्ती, कुटुंब, समाज यांच्या हितासाठी करावयाची साधना म्हणजे शुक्ल यातू. धनधान्य वाढावे, पुत्रपौत्र समृद्धी मिळावी, व्यक्ती, समाज निरोगी राहावा, यासाठी शुक्ल यातूची आराधना केली जाई. तर शेजाऱ्याच्या शेतातले धान्य जळावे, सवत वांझ व्हावी, शत्रू रक्ताच्या उलट्या होऊन मरावा यांसाठीचे उपाय म्हणजे कृष्ण यातू. चेटूक करणे, मूठ मारणे, भानामती, काळी जादू हे त्याचे प्रकार. जगातील सर्व धार्मिक कल्पनांचा पाया या विचारापासून बनलेला होता. 'यातू' निर्भरतेवर आधारलेले हे धर्मजीवन संदेहवादी तत्त्वचिंतन आणि नंतर विज्ञानाचे आघात याने दुर्बल होऊन अस्त पावू लागणे स्वाभाविक होते; परंतु ते ज्या प्रमाणात घडून येईल असे वाटले तसे ते घडून आल्याचे दिसत नाही.

प्रत्यक्षात यातू व धर्म या संज्ञांनी निर्देशित केल्या जाणाऱ्या समजुती व आचार यांच्यामध्ये एकरूपता आढळते. साधे घरबांधणीचे उदाहरण घेतले तर आजही सुशिक्षित बहुसंख्य व्यक्तीही भूमिपूजन करतात त्यामुळे घर बांधावयाच्या जागेतील दुष्ट शक्ती नाहीशा होतात, ही कल्पना असते. चौकटीपर्यंत घराचे बांधकाम झाले की त्या चौकटीला काळी बाहुली उलटी टांगतात. लिंबू-मिरची बांधतात. घर बांधून पूर्ण झाले की वास्तुशांती केली जातेच. कुलपरंपरा असेल तर पशुहत्याही केली जाते. भारतीयच नव्हे तर महाराष्ट्रीयन सुशिक्षित समाजही (समाजसुधारकांचा वारसा सांगत असताना) धर्म या संज्ञेचा तात्त्विक आश्रय पाहण्यास उत्सुक नाही व जिज्ञासेने पाहतही नाही. धर्मश्रद्धा म्हणजे पारंपरिक धर्मश्रद्धा असेच बहुतांशी समीकरण लोकमानसात आजही रूढ आहे.

श्रद्धांच्या दृष्टीने आजही असे वर्णन करता येईल की सामान्य लोकसमुदाय आजही यातूनिर्भर धर्मश्रद्धेला धरूनच आहेत. जातपात, दैवतोपासना, बळी देण्याची पद्धत लग्नानंतरचा गोंधळाचा कार्यक्रम, मुरळ्या-वाघे यांची प्रथा मंत्रतंत्र, शकुन, फलज्योतिष, तोडगे, ताईत या साऱ्या गोष्टींचा पगडा सर्व जाती जमाती पर्यंत आणि रावापासून रंकापर्यंत सर्वांवरच आहे. या प्रभावाव्यतिरिक्त यातूनिर्भर श्रद्धेला विरोधी अशा श्रद्धाही नागर समाजातील काही व्यक्तींच्या मनात नांदत आहेत; परंतु या दोन्हींमध्ये काही मोठा संघर्ष झाल्याचे दिसून येत नाही.

संतांची भक्ती व शिकवण वेगळ्या प्रकारची आहे. माणसाने आपले कर्तव्यकर्म करावे पण ते ईश्वराची आज्ञा म्हणून ईश्वरार्पण बुद्धीने करावे, अंत:करणाच्या शुद्धीला व ईश्वरविषयक

तळमळीला प्राधान्य द्यावे. क्षुद्र देवतांची उपासना सोडावी. माणुसकीने व करुणेने वागावे, हे संतानी सांगितले आणि आचरलेही. पण नव्या श्रद्धेचा हा भक्तिमार्ग संतांच्या शिकवणीनंतरही पारंपरिक दैवत श्रद्धेची जागा घेऊन भारतीय/ मराठी मनाला व्यापून टाकू शकला नाही. पाप-पुण्याचे आणि त्यासाठी करावयाच्या कर्मकांडाचे, यातूक्रियांचे साम्राज्य अबाधित राहिले. त्यातच एका छोट्या क्षेत्रात संतानी कोणकोणती धार्मिक कृत्ये करावी ? आपापल्या दैवतांची उपासना कशी करावी आणि आपले पारलौकिक कल्याण कसे साधावे, हा खरे तर त्या-त्या व्यक्तीचा प्रश्न आणि त्याचा-त्याचा अधिकारही. पण त्यासाठी जे केले जाते त्यामध्ये फक्त आंधळेपणाच असेल तर ? धार्मिक उपासना म्हणून त्याचा आदर करावयाचा की सारासार माणूसपणा गहाण पडतो म्हणून त्याचा अव्हेर करायचा? महाराष्ट्रातल्या जत्रा-यात्रांच्या पावलोपावली हा प्रश्न आम्हांला पडतो. देवाला केलेला नवस फेडण्यासाठी पळत येऊन मंदिराच्या दगडी भिंतीवर टक्कर देऊन डोके फोडून घेणे, पाठीच्या कातडीतून धारदार गळ आरपार घालून घेणे, बैलगाडीवर ठेवलेल्या काठीवरच्या बगाडाला टांगून सकाळपासून संध्याकाळपर्यंत ती बैलगाडी पळवत नेणे, गंजलेल्या एकाच वस्तऱ्याने शंभरजणांनी स्वत:च्या कपाळावर चीर मारून रक्त ओघळत असताना देवाला प्रदक्षिणा घालणे, नवसाचे बकरे भगताने दाताने तोडून मारणे, रेडा मारून त्याच्या रक्तात हाताचा पंजा भिजवून तो गुरवांच्या अंगावर आणि देवळाच्या भिंतीवर उठवणे, नवस फेडण्यासाठी हजारोंच्या संख्येने देवापुढे बोकडे मारून रक्तमांसाचा चिखल करणे, आगीवरून चालणे, धुळीत लोटांगण घालत (म्हणजे गडबडा लोळत) देवळाला प्रदक्षिणा घालणे व अनेक मैल जाणे, त्या-त्या भक्तसमुदायाच्या लेखी ती उपासना पद्धत असते. आरती कितीवेळा करावी अथवा नमाज किती वेळा पढावा ? गायत्री मंत्राचे पठण कसे करावे ? रुद्राक्षाची माळ कितीदा ओढावी ? रोजे किती कडक पाळावेत ? मांसाहार पूर्णपणे सोडावा सूर्यास्तापूर्वीच भोजन उरकून घ्यावे, अग्निहोत्राने स्वत:ची आध्यात्मिक उन्नती साधावी, अशा उपासनेच्या प्रत्येकाला इष्ट वाटणाऱ्या आणि फलदायी ठरणाऱ्या अनेक पद्धती, त्या इतर कोणाला अर्थहीन आणि अनावश्यक वाटल्या तरी त्याचे आचरण करण्याचा आणि आपले लौकिक व पारलौकिक कल्याण साधण्याचा व्यक्तीचा अधिकार मान्यच आहे; परंतु डोळसपणे त्याची कालसापेक्ष चिकित्सा करण्याचा अधिकारही मान्य व्हावयास हवा की नको ?

दगडूशेठ हलवाई गणपतीपुढे अग्नीत लक्ष मोदकांची आहुती दिली, ते उपासना स्वातंत्र्य म्हणून मान्य करावे काय ? विश्वशांतीच्या नावाने लक्षावधी लोकांना जमा करून यज्ञ संस्कृतीचे पुनरुज्जीवन करावे काय ? वैराग्याची मूर्ती असणाऱ्या बाहुबलीच्या मस्तकावर शेकडो लिटर दही, दूध, तूप, मध यांचा वर्षाव धर्मउपासनेशी सुसंगत की विसंगत ? अर्थहीन, कालबाह्य व्रते ही धार्मिक उपासनेचा भाग आहेत काय ? वटवृक्ष जोपर्यंत उभा आहे तोपर्यंत पांथस्थाला सावली देणार आणि जीर्ण -शीर्ण झाल्यावर सावलीसाठी थांबलेल्या वाटसरूचा बळीही घेणार. त्याला दोरे गुंडाळून पूजा करून प्रदक्षिणा घालून पतीचे आयुष्य कसे वाढेल ? हरतालिकेचे व्रत करण्याचा आणि चांगला नवरा मिळण्याचा व जन्मोजन्मी तोच लाभण्याचा संबंध काय ?

केली कर्मकांडे तर बिघडले काय ? असा प्रश्न सतत विचारला जातो. ज्या परमेश्वराच्या उपासनेसाठी ती केली जातात, तो मानणाऱ्या संतसज्जनांनाही त्यांची गरज लागत नाही. परमेश्वराचे नुसते नामस्मरणही त्याला पोचते, असा त्यांचा विश्वास असतो. खरा प्रश्न असतो भावना परोपकाराची हवी. नीतिची हवी. ती भावना नसून कर्मकांडे असतील, तर त्याचा उपयोग शून्य आणि शुद्ध भावना असेल तर कर्मकांडांची गरजच नाही. कर्मकांडाचे तोटे फार. एक तर कर्मकांडप्रधान पंथ आणि व्यक्ती, बौद्धिकदृष्ट्या योग्य अशा ऐहिक व्यवहारास दुय्यम स्थान देतात, त्यामुळे सामाजिक अवनती होते. उदा. संशोधन मागे पडते. दुसरे असेही की ज्या समाजात अशा कर्मकांडाचे स्तोम माजते त्या समाजाची आर्थिक पीछेहाट होते. आर्थिक व्यवहारात लागणारा उत्साह भजन-पूजनात जातो. श्रीमंतांनाच हे परवडते आणि मोक्षाचे धनीही तेच होतात. खरे तर ही कर्मकांडे हा एक प्रकारचा बहि:र्मुख निवृत्तीमार्ग आहे. माणूस त्यामुळे आत्मकेंद्रित होतो परलोकाच्या कल्पनेत अडकतो. याशिवाय पुरोहित वर्गाचा स्वार्थ साधला जातो, हे तर आहेच.

तथाकथित उपासना, धार्मिक आचरण यामध्ये नीतिचा रसदार गाभा बहुदा दुर्लक्षित राहतो, डावलला जातो आणि कालबाह्य कर्मकांडाच्या कौतुकांचे नारे जोरात पिटले जातात.

रुढी, परंपरा, उपासना यांना मानवी जीवनात मोठे स्थान आहे. यासाठी या धर्माविष्काराचा, त्यामागील जाणिवांच्या इष्टता-अनिष्टतेचा म्हणूनच शोध घ्यावा लागतो. तो धर्मविरोध नसतो पण साक्षेप करणारा विचार असतो.

धर्म म्हणजे रुढी, परंपरा, उपासनापद्धती, सज्जनपणा, सद्‌गुण एवढाच अर्थ नाही. आम्हाला धर्माचे राज्य स्थापन करायचे आहे, असा पुकारा या देशात अनेकजण करतात. त्यावेळी त्यांचे दाखवायचे दात आणि खाण्याचे दात वेगळे असतात. धर्म याचा अर्थ लोकांना सांगण्यासाठी नैतिक व सांस्कृतिक मूल्यांना असलेली एकूण निष्ठा हा असला तरी व्यवहारातील अभिलाषा, धर्माच्या आधारे समाज नियंत्रणाची असते. समाजव्यवस्था शास्त्र हा गुलामगिरीच्या व सरंजामशाहीच्या काळात धर्माचा विषय होता. आधुनिक काळात समाजव्यवस्था शास्त्र हा राजकारणाचा विषय आहे; धर्माचा नव्हे.

धर्मभावनेचा विचार करताना म्हणूनच तीन महत्त्वाच्या बाबी पुढे येतात. एक धर्माच्या नैतिक आशयाच्या आचरणाची, दुसरी संविधानातील धर्मनिरपेक्षतेच्या कल्पनेच्या चोख अंमलबजावणीची आणि तिसरी विवेकवादी जीवनदृष्टीने धर्माला एक समग्र पर्याय देण्याची.

सर्व धर्मांत नैतिक आशयाचे सूत्र आहे आणि त्या-त्या काळात मानवाला दिलासा देणारी नैतिक आचारसंहिता म्हणूनच धर्माचा जन्म झाला. या नैतिक आदेशाप्रमाणे लोकांनी त्या-त्या वेळी काही प्रमाणात वर्तन केलेही असेल; परंतु सर्व धर्मांमध्ये हितसंबंधांचा पगडा तयार झाला आणि शब्दप्रामाण्य, धर्मगुरूची आज्ञा, चाकोरीबध्द कर्मकांड, यांना महत्त्व प्राप्त झाले. धर्मांचा नैतिक आशय विचारण्याचा मुद्दा प्रत्यक्षात साफ बाजूला पडलेलाच दिसतो. याही पुढे असे घडले की धर्माच्या नावाने उफराटा व्यवहार चालू झाला आणि कथाकथित धार्मिक नीती माणसाचा चुराडा करू लागली. स्त्रियांना शिक्षण नाकारणे असो अथवा दलितांना स्पर्शबंदी असो, या गोष्टी धार्मिक म्हणजेच नैतिक म्हणून आचरणात आणल्या जावू लागल्या, अशा नीतिला प्रश्नचिन्ह लावणे यातच प्रगतीचे बीज आहे. याबरोबरच पारंपरिक मूल्यांची विश्वासार्हता नव्या गतिमान आधुनिक समाजजीवनात धोक्यात आली. उदा. पातिव्रत्य हे एकेकाळी धार्मिक मूल्य होते. कसल्याही वर्तनाच्या पतीसोबत पत्नीने अविचल निष्ठेने राहावे, असे हे मूल्य सांगत होते. आजच्या जमान्यात व्यक्ती म्हणून स्वत:ला प्रतिष्ठा लाभलेली स्त्री, या मूल्यांना मान्यता देणार नाही. पतीकडूनही अव्यभिचारी निष्ठेची अपेक्षा धरेल. दान देणे आणि कृतार्थ होणे, हे झाले पारंपरिक मूल्य. आजचे मूल्य आहे दानापेक्षा घामाचे हक्काचे चोख दाम घेणे.

या स्वरूपाच्या चिंतनातून नवीन इहवादी नीतिचा जन्म झाला. ती धर्माच्या विरोधात नव्हती परंतु शारीरिक, मानसिक आणि ऐहिक कल्याणावर आधारित होती. धार्मिक नीतिप्रमाणे निरर्थक उपासाची, अर्थहीन कर्मकांडांची, मानसिक बंधनांची आवश्यकता नव्हती. व्यक्ती - स्वातंत्र्य व व्यक्तिगत जबाबदारी हा या नीतिचा पाया आहे. अधिकाधिक लोकांचे अधिकाधिक हित व जीवन सुसंगत पध्दतीने सहज प्रवृत्तीची पूर्तता हा या नीतिचा गाभा आहे. या नीतिच्या बाबत एक गोष्ट पक्की ठेवावयास हवी. नीतिमूल्य निर्माण होणे आणि समाजाची धारणा त्यामधून होणे, याला सामाजिक परिस्थितीचा मोठा संदर्भ असतो. सामाजिक हितसंबंध निरपेक्ष अशी नीति नसते, ही झाली एक बाजू. दुसरी बाजू अशी की स्वत:शी इतरांनी जसे वागावे अशी अपेक्षा असते तसे इतरांशी स्वत: वागणे हे नीति विचाराचे सूत्र होय आणि हे समजून घेऊन सारासार बुध्दीने माणूस निर्णय घेऊ शकतो. त्यासाठी धर्माची गरज नाही. देवाची भिती किंवा मोक्षाची लाच यापेक्षा नीतिचे वर्तन करण्याचा स्वत: घेतलेला निर्णय अधिक श्रेयस्कर असतो. प्रसंगी साऱ्या हितसंबंधांना विरोध करूनदेखील माणूस आग्रहपूर्वक विरोध करून वागतो कारण तशा पध्दतीने वागणे हे माणूस म्हणून त्याची प्रतिष्ठा असते. एकतर तो निर्णय स्वत:चा असल्याने त्यामध्ये स्वातंत्र्याचा आविष्कार असतो. दुसरे असे की देवाच्या भीतीने होणारे नीतिचे वर्तन हे जेवढी भीती तेवढीच नीति या पध्दतीने असते; परंतु विवेकाधिष्ठित नीति ही भीतीपोटी नसल्याने स्वत:ची विवेकीभावना प्रखर करून त्या नीतिचा आचरण वाढवता येणे शक्य असते. मनुष्य समूहातच जगतो, वाढतो, जीवनयात्रा पुरी करतो. यासाठी प्रेम, वात्सल्य, परोपकार, स्नेहभाव या मानवी मूल्यांचा अंगिकार त्याला अपरिहार्य असतो. जणू त्याच्या अस्तित्वाची ती पूर्वअट असते कारण त्याशिवाय समूह म्हणून जगणे त्याला शक्य नाही. मी सुखी असण्यासाठी समाज नीतिमान असावा व समाज नीतिमान असण्यासाठी त्यातील प्रत्येक व्यक्ती नीतिने वागणारी असावी, हा कार्यभाव सहज पटणारा आहे. त्यासाठी कुठल्याही गूढ तत्त्वाचा आधार घेण्याचे कारण नाही. तरीही हे स्पष्ट करावयास हवे की सच्च्या धार्मिक भावनेने जर कोणी नीतिचे आचरण करत असेल तर त्याचे स्वागतच करावयास हवे. ही गोष्ट लक्षात घ्यावयास हवी की नीतिमूल्ये ही समाजकालसापेक्ष असतात आणि नीतिमूल्ये कालानुरूप तावून, सुलाखून घेणे यात काहीही गैर नाही. माणूसपण जपणारी, शाश्वत जीवनमूल्यांना आधार देणारी, माणसाचे व समाजाचे उन्नयन करणारी नीति विवेकनिष्ठ विचारातून येवो की धर्मभावनेतून, ती जर खऱ्या उमाळ्याची असेल आणि नीतिचा कृतिशील आचार व त्यासाठी कालोचित समाजबदलाची गरज मान्य करत असेल तर त्याचे स्वागतच करावे लागेल.

धर्मभावनेचा विचार करताना आणि आचार रुजवताना धर्मनिरपेक्षतेचा मुद्दा नीट समजावयास हवा. खरेतर धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व हे विश्व स्वायत्तपणे अस्तित्व आहे आणि कार्यकारण भावनेने बध्द आहे, या वैज्ञानिक जाणिवेवरच आधारित आहे. त्यापुळे व्यक्तीला धर्मपालन व उपासना याचे स्वातंत्र्य असले तरी आजूबाजूला समाजात जे काही घडते त्याची मीमांसा देव आणि धर्म या आधारे कोणी करत नाही. भारताचे संविधान हे या अर्थाने धर्माकडे पाठ फिरवणे हे आहे. मानवाच्या ऐहिक कल्याणाची जबाबदारी येथील शासनाची, समाजाची आहे. भारताची घटना धर्मनिरपेक्ष आहे. सध्या देशाच्या राजकीय पटावरदेखील धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व हे महत्त्वाचे ठरले आहे. मात्र त्याचे स्वरूप काय आहे, याबाबत मतभिन्नता आढळते. भारतीय घटनेतील धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व असे सांगते की,

अ) प्रत्येक व्यक्तीला धर्मपालनेचे व उपासनेचे स्वातंत्र्य आहे. स्वत:चे पारलौकिक कल्याण, अध्यात्मिक उन्नती व उपासना पध्दती याबाबत व्यक्ती स्वत:चे निर्णय स्वत: घेऊ शकते.

ब) वरील पध्दतीच्या धर्मपालनास शासन मदत करणार नाही, विरोध करणार नाही व हस्तक्षेप करणार नाही.

क) धर्म आणि उपासना यांतील विभिन्नतेमुळे कोणाही व्यक्तीला भेदभावाची वागणूक मिळणार नाही.

याचा अर्थ असा की, आपल्या देवाची पूजा कशी करावी, आपले पारलौकिक कल्याण कसे साधावे आणि व्यक्तिगत अध्यात्मिक उन्नती कोणत्या मार्गाने करावी, याबाबत देशाच्या संविधानाने नागरिकाला स्वातंत्र्य दिले आहे, त्याचा आदर करावयास हवा; परंतु धर्मपालनाचे हे स्वातंत्र्यदेखील निरपवाद नाही, हे लक्षात ठेवणे फार महत्त्वाचे आहे. सार्वजनिक नीतिमत्ता

कायदा सुव्यवस्था, राष्ट्रीय एकात्मता व सार्वजनिक आरोग्य तसेच भारतीय घटनेत दिलेले नागरिकांचे मूलभूत हक्क याबाबत ज्यावेळेला धर्मपालन व उपासना याचे स्वातंत्र्य विसंवाद निर्माण करेल, त्यावेळी धर्म स्वातंत्र्याचा संकोच करण्याचा अधिकारही भारतीय घटनेने लोकशाही शासनाला दिला आहे. यामुळेच चंद्रगुप्पी ( जिल्हा शिमोगा कर्नाटक ) येथील रेणुका मातेची नग्न यात्रा सार्वजनिक नीतिमत्तेशी गैर असल्याने शासनाने मोडून काढली. पंढरीच्या पांडुरंगावर कितीही प्रगाढ श्रध्दा असली तरी कॉलरेची लस टोचून घेतल्याशिवाय यात्रेला जाता येत नाही. कारण प्रश्न लोकांच्या आरोग्याचा असतो. सुवर्णमंदिर हे शिखांचे सर्वोच्च पवित्र धर्मस्थळ पण देशापासून फुटून निघण्याची घोषणा करणारे खलिस्तानवादी अतिरेकी जर तेथे लपून बसले तर राष्ट्रीय एकात्मता राखण्यासाठी देशाचे सैन्य तेथे घुसते व धर्माच्या पावित्र्याचा मुद्दा गौण ठरवला जातो. मंदिराची उभारणी असो वा देवाची मिरवणूक, कायदा आणि सुव्यवस्थासाठीचे शासनाचे नियम पाळावेच लागतात. धर्मस्वातंत्र्याच्या नावाने त्या नियमांना धाब्यावर बसवता येत नाही.

आपल्या देशातील आजचे वातावरण धर्मनिरपेक्षतेचे नाहीच तर सर्वधर्मभावाच्या नावाखाली धर्म शरणागतीचे आहे. लोकांच्या धार्मिक भावनांना पद्धतशीरपणे उधाण आणण्याचे काम, धर्म, त्यांचे पंथ-उपपंथ, मंदिरे, मठ, पूजा, यात्रा, होमहवन या सर्वांद्वारे आपल्या धर्मात त्या-त्या धर्माचे अनुयायी करत आहेत. दुसरा धर्म, पंथ, जात संघटित व आक्रमक होत आहे, यामुळे आपण त्याच्यापेक्षा अधिक संघटित व आक्रमक व्हावयास हवे, असे समर्थन धर्माच्या वापरासाठी खुबीदारपणे दिले जाते. सहज नजर टाकली तरी वर्षभरातील गणपती, नवरात्र, गणेश जयंती, महाशिवरात्र, रामनवमी, हनुमान जयंती, दत्त जयंती, गुढीपाडवा, शिवजयंती आणि इतर असे अनेक दिवस यांमध्ये इथले जनमानस गुंतून राहावे यासाठी पद्धतशीर प्रयत्नहोत असल्याचे आढळतो. त्याशिवाय या धार्मिक सणांच्या वाट्याला एवढी भरभराट आपोआप आलीच नसती. हे धर्मभावनेचे व्यापारीकरण चालू आहे. त्याचबरोबर येथील माणसाची मानसिकता जी अंगभूतपणे धार्मिक आहे त्या धार्मिकतेला धर्मांधतेकडे वळवण्याचे पद्धतशीर प्रयत्न सुरू आहेत. माणसाचे धार्मिक मन हा जणू कच्चा माल आहे. मतपेटीतील मतामार्फत सत्ता संपादनाच्या रूपाने पक्का माल बाहेर पडावा, यासाठी धर्म भावनांचे हे बाजारीकरण म्हणजेच खरे तर राजकारण आहे. हिंदू धर्मात ही लागण झाली की त्याच्या क्रिया-प्रतिक्रिया अन्यत्र उमटणारच. अशामध्ये मग स्वाभाविकपणेच सर्व मूळ प्रश्नांचे, खऱ्या मूल्यांचे भान हरपते. हे आत्मभान या समाजाला पुन्हा मिळवून देणे हे शिक्षण क्षेत्राचे कार्य मानावयास हवे.

## सत्यशोधकी वारसा

वैज्ञानिक दृष्टिकोन, विवेकवादी जीवनमूल्ये, शोषणरहित समाजरचना याचा कृतिशील आग्रह धरणारी सत्यशोधकी विचाराची चळवळ महाराष्ट्रात निर्माण झाली व काही काळ ती प्रभावी होती. जाती निर्मूलन, स्त्री-पुरुष समता, कष्टकऱ्यांची व श्रमाची प्रतिष्ठा, व्यसनमुक्ती अशी या चळवळीची काही ठळक वैशिष्ट्ये सांगता येतील. खरेतर आपल्या देशाच्या घटनेने ही मूल्यात्मकता स्वीकारलेली आहे; परंतु त्याबाबतही प्रखर प्रबोधन व कृती कार्यक्रम याचा अभाव जाणवतो. यातील काही प्रश्न गुंतागुंतीचे आहेत; परंतु तसे असेल तर अधिक निर्धारपूर्वक त्याचा निपटा करावयास हवा. जाती निर्मूलन हा असाच एक प्रश्न आहे. एका बाजूला जात हे इथल्या भौतिक वास्तवाचे रूप आहे. जातीच्या आधारे या देशात दीर्घकाळ उत्पादन व्यवस्था राहिली आहे व आजही काही प्रमाणात आहे. दुसऱ्या बाजूला उच्च-नीच, पवित्र-अपवित्र या पद्धतीची सूक्ष्म पण प्रभावी मानसिकता समाजाच्या सर्व स्तरांत जातीने निर्माण केली आहे. ही मानसिकता बदलण्याचीही गरज आहेच. या बरोबरच निवडणुकीच्या राजकारणामुळे जातीला एक प्रभावी अवसर प्राप्त झाला आहे. त्याद्वारे जाती निर्मूलन घडून येईल की वेगळ्या प्रकारे जातीचे हितसंबंधी संघटन होऊन शोषणाच्या मूळ प्रश्नाला बगल दिली जाईल, याबद्दलचे मतभेद आढळतात. आंतरजातीय विवाह, धर्मग्रंथाची चिकित्सा, साधन संपत्तीचे फेरवाटप व आरक्षण, असे जात निर्मूलनाचे काही प्रभावी उपाय डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सुचविले होते. याबाबत प्रबोधन व कृती कार्यक्रम याचा अभाव जाणवतो. स्त्री-पुरुष समता हा असाच आणखी एक विषय. त्याला तत्त्वत: सर्वांची मान्यता आहे; परंतु प्रत्यक्षात हुंड्याचा आकडा कमी न होता वाढतोच आहे. स्त्री जीवनाची असुरक्षितता वाढली आहे. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत समतावादी धारणेने तिची कदर होते आहे असे चित्र कोठेच आढळत नाही. श्रमाची महती म. फुलेंपासून म.गांधीपर्यंत सर्वांनी गायली आहे; परंतु अंगमेहनत ही व्यवहारात फक्त असंघटित कष्टकऱ्यांसाठी आहे आणि शरीरश्रमाच्या प्रतिष्ठेचा इतर समाजात मागमूस नाही, असेच चित्र आहे. शरीरश्रमाला नकार देणारे आणि पंख्याखालच्या कथित बौद्धिक कामाची मागणी करणारे असे वास्तव शिक्षण क्षेत्रात व समाजजीवनात आहे. वाढती व्यसनाधिनता तर भयसूचक इशारा देते आहे. तंबाखू असो, दारू असो वा गर्द; त्यापैकी प्रत्येक गोष्ट ही व्यसन जडल्यावर विनाशाचे आमंत्रणच ठरते. परदेशात तेथील नागरिकांनी बलाढ्य असलेल्या आंतरराष्ट्रीय तंबाखू कंपन्यांचा पराभव करून आपल्या देशातील सिगरेटचा प्रसार रोखला. या कंपन्या मुक्तपणे भारतात हात-पाय पसरत आहेत. त्याच्या जोडीला गुटखा आला आहे. सांस्कृतिक कार्यक्रम आणि क्रीडा स्पर्धा यांचे प्रायोजकत्व या कंपन्या करतात आणि त्या मार्फतच्या जाहिरातींमधून भारतातील तरुण पिढीपर्यंत बरबादी पोहोचवतात. याहून आणखी भयानक गोष्ट म्हणजे मद्य प्राशन. ही आता प्रतिष्ठेची बाब बनू लागली आहे. भारतात मद्याच्या खपासाठी अजून प्रचंड प्रमाणात बाजारपेठ उपलब्ध आहे. असा शोध आंतरराष्ट्रीय मद्य निर्मिती उद्योगाने लावलाच आहे. वैज्ञानिक आकडेवारी असे सांगते की, ज्यावेळी शंभर जण दारूचा ग्लास हातात घेतात, त्यावेळी त्यातील १० ते १३ टक्के व्यक्ती मद्यपी बनतात. मद्याच्या वाढत्या खपाबरोबर दारुड्यांची समाजातील संख्या वाढणार आहे व त्यामध्ये तरुणांची संख्या सर्वाधिक असणार आहे.

येथपर्यंत केलेल्या विवेचनाचा अर्थ काय ? अर्थ असा की-वैज्ञानिक दृष्टिकोनावर आधारित, धर्मचिकित्सा करणारा, धर्म, जात निरपेक्ष, स्त्री-पुरुष समतावादी, श्रमाची व कष्टकऱ्यांची प्रतिष्ठा जोपासणारा, व्यसनमुक्त समाज उभारण्याचा संकल्प सत्यशोधकी विचारापासून ते भारताच्या संविधानापर्यंत केला गेला आहे. मात्र, त्याची आजवरची वाटचाल अतिशय असमाधानकारक आहे, अपुरी आहे. अशा संकल्पासाठी जो संस्कार करावा लागतो व जे आग्रह धरावे लागतात त्यामध्ये एकूण समाज व विशेषत: शिक्षण क्षेत्र अपुरे पडले आहे. असे आग्रह करणे म्हणजे स्वत:च्या जीवनात जाणीवपूर्वक बदल घडवणे आणि उपक्रमांच्या साखळीद्वारा समाज बदलाचे वातावरण व शक्ती निर्माण करणे. वैज्ञानिक दृष्टिकोनच असे सांगतो की, व्यक्ती आपल्या भोवतालच्या परिस्थितीचे ज्ञान स्वत: करू शकते आणि स्वत:च्या कर्तृत्वाने व निर्धाराने त्यात बदलही घडवून आणू शकते. हा विचार वसा म्हणून स्वीकारलेल्या विद्यार्थ्यांचे व त्यांना मदत, मार्गदर्शन करणाऱ्या प्राध्यापकांचे गट महाविद्यालययाला या माध्यमातून उभे करणे, त्यासाठी शिक्षण संस्थांचे हार्दिक सहकार्य मिळवणे व वैज्ञानिक जाणिवांची एक कृतिशील जाग आग्रह व निर्धार समाजात उभा करणे, हे परिषदेचे प्रयोजन आहे.

## कृती कार्यक्रमाची आखणी :

या पुस्तिकेत मांडण्यात आलेला विचार ही एक रूपरेखा आहे. परिषदेतील विचार मंथनातून त्यात भर पडेल आणि त्यानंतरही भर पडणे चालू राहील. तसेच मांडणीबाबत काही मतभिन्नताही संभवते आणि ती स्वाभाविक व स्वागतार्ह आहे, असे मी मानतो. पुस्तिकेतील विचार व परिषदेतील विचारमंथन हे महाविद्यालयात पोहोचविण्याचा एक धडक कार्यक्रम महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती घेणारच आहे. अन्य समविचारी संघटनांच्या सहकार्यानेही तो घेता येईल किंवा त्यां संघटना स्वतंत्रपणेही असा कार्यक्रम घेऊ शकतील. असा कार्यक्रम व त्याबाबतची कार्यवाही याची रूपरेखाही सामान्यपणे पुढीलप्रमाणे असेल.

१) महाविद्यालयात विद्यार्थी व प्राध्यापकांसमोर हा विचार व कृती कार्यक्रम मांडणारे व्याख्यान देण्यात येईल.

२) हा विचार व कृती कार्यक्रम ज्यांना अंमलात आणावयाचा आहे, अशा इच्छुक विद्यार्थी / प्राध्यापक यांचे फॉर्म त्याच सभेनंतर भरून घेतले जातील.

३) त्या दिवशी संध्याकाळी त्याच गावात फॉर्म भरून देणाऱ्या विद्यार्थी व प्राध्यापकांची बैठक घेतली जाईल व त्यांना तपशीलवार कल्पना देण्यात येईल, शंका समाधान करण्यात येईल.

४) महाविद्यालयातील हा गट शिक्षण संस्था व प्राचार्य यांच्या अनुमतीने सुरू होईल.

५) विचार कृती पत्राद्वारा अशा गटांच्या सोबत नियमित संपर्क साधला जाईल.

६) दिवाळीच्या सुट्टीत अशा गटांचे प्रशिक्षण शिबिर घेण्यात येईल. त्यामुळे विचाराची स्पष्टता व वाढ याला मदत होईल.

७) महाराष्ट्रात १५ ऑगस्टपूर्वी किमान १०० महाविद्यालयांत असे गट उभे करण्याचा मानस आहे. याबाबत संपर्काचा पत्ता : डॉ. नरेंद्र दाभोलकर, १५५, सदाशिव पेठ, सातारा-४१५००२, फोन नं. ३२३३३ (०२१६२)

विचार व कृती करणाऱ्या गटांचे खरे सामर्थ्य त्यांच्या वैचारिक कसदारपणात व प्रत्यक्ष कृतिशीलतेवर अवलंबून आहे. विद्यार्थ्यांनी वाचनाची व चर्चेची तयारी दाखवली तर त्यांना समजतील, आवडतील, अशी पुस्तके मराठीत बरीच आहेत. अशा काही पुस्तकांच्या आधारे नियमितपणे चर्चा सुरू करता येईल.

परंतु अशा गटांचे खरे सामर्थ्य सतत छोटी-मोठी कृती करण्यावर आहे. असे काही अनुभवसिद्ध कृती कार्यक्रम खाली संक्षिप्तपणे दिले आहेत. त्याबाबत महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समितीकडून सर्व मदत व मार्गदर्शन मिळू शकेल. समविचारी अन्य संघटना आणखी काही कार्यक्रम सुचवतील. महाविद्यालयातील गटांना काही अभिनव उपक्रम सुचतील, ज्याचे इतरत्र अनुकरण होईल. हे सर्व लक्षात घेता पुढील उपक्रम ही नमुन्यासाठी काही उदाहरणे आहेत, असे समजावे.

## उपक्रम :

### १) छोटे वाचनालय स्वत:च्या गटासाठी उभे करणे :-

जी पुस्तके आपल्या गटाच्या वैचारिक जडणघडणीसाठी आवश्यक आहेत, अशी किमान काही पुस्तके जमा करावीत. विकत घेणे, देणगी, पुस्तकभेट, अशा विविध मार्गाने हे करता येईल. ही पुस्तके गटातील कार्यकर्ते वाचतीलच, हे पाहावयास हवे. शक्यतो गटात नसलेल्या इतरही काही मित्रांना ही पुस्तके वाचण्यास द्यावीत. तसेच पुस्तकातील उद्बोधक माहिती छोट्या-मोठ्या वयाच्या मित्रांच्या गटात वा सार्वजनिक ठिकाणी जाहीरपणे वाचण्याचा उपक्रमही घेता येईल.

### २) वैज्ञानिक जाणीव जागृती प्रशिक्षण घेणे / इतरांना देणे / परीक्षेला बसवणे :-

महाराष्ट्र अंधश्रध्दा निर्मूलन समितीने वैज्ञानिक जाणीव जागृतीचा एक अभ्यासक्रम तयार केला आहे. त्यामध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन, श्रध्दा, अंधश्रध्दा, मन व मनाचे आजार, देवीचे झपाटणे, भूताचे अंगात येणे, फलज्योतिष व विज्ञान, विवेकवाद, देव धर्म व नीती, चमत्कारांची प्रात्यक्षिके, बुवाबाजी विरोधाची वैचारिक भूमिका अशा विषयांचा समावेश आहे. इच्छुक विद्यार्थ्यांना या बाबतचे दोन दिवसांचे प्रशिक्षण देण्यात येते. विद्यार्थी स्वत: या बाबतच्या

परीक्षेला बसू शकतात. हे शिक्षण प्राथमिक वा माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांना देऊन त्यांनाही परीक्षेला बसविता येते.

याबरोबर वयात येताना (मुलांसाठी), वयात येताना (मुलींसाठी), व्यसनमुक्ती, सर्पविज्ञान, मनोविकार व भूतबाधा, वैज्ञानिक दृष्टिकोन व चमत्कार यांचे छोटे अभ्यासक्रमही तयार केलेले आहेत. त्याचा अभ्यास करून त्या परीक्षांना स्वतःला बसता येईल. शालेय विद्यार्थ्यांना ते ज्ञान देऊन त्यांना परीक्षेला बसवता येईल.

या प्रकल्पाचे अध्यक्ष ज्येष्ठ शास्त्रज्ञ डॉ. वसंत गोवारीकर आहेत. त्यांच्या सहीचे प्रमाणपत्र विद्यार्थ्यांना देण्यात येते.

(याबाबतच्या अधिक माहितीसाठी कुमार मंडपे, जिज्ञासा, २४/१,विसावा नाका, सातारा या पत्त्यावर संपर्क साधावा.)

**३) भानामती निर्मूलन धडक मोहीम :-**

अंगावर बिब्याच्या फुल्या आपोआप उठणे, आपोआप कपडे फाटणे, जळणे, अन्नात राख मिसळणे अशा गूढ भयचकित घटनांना 'भानामती' म्हणतात. या सर्व घटना आपण वैयक्तिक दृष्टिकोनातून निश्चितपणे शोधू शकतो व थांबवू शकतो.मराठवाडा विभागात स्त्रीयांच्या अंगात येते. त्या घुमतात, गडागडा लोळतात. भूंकतात, याही प्रकाराला 'भानामती' म्हणतात. हा प्रकारही निश्चितपणे थांबविता येतो.

**४) फलज्योतिषाविरुध्द लढा:-**

जन्मकुंडली हा आपल्या भविष्याचा म्हणजे एका अर्थाने दैवाचा नकाशा असतो. माणसाचे भविष्य त्याच्या हातात, कर्तृत्वात, सामाजिक परिस्थितीत नाही, तर ते ग्रहगोल ताऱ्यात आहे, असा चुकीचा संदेश कुंडली देते. माणसाला दैववादी बनवते. म्हणून युवकांनी स्वतः कुंडली न बघता लग्न करण्याचा संकल्प करावा आणि दैववादाचे प्रतीक असलेल्या कुंडलीची जाहीर होळी करावी.

**५) हुंडाविरोध :-**

हुंड्याला समाजात पुन्हा एकदा प्रतिष्ठा प्राप्त होते आहे. अशावेळी हुंडा घेणे हा प्रकार बदनाम करावयास हवा आणि युवकांनी प्रतिष्ठापूर्वक त्याचा त्यागही करावयास हवा. (याबरोबरच स्त्रीला आपल्या वडिलांच्या मालमत्तेतील रास्त वाटा मिळण्याचा आग्रहही धरावयास हवा.)

**६) बुवाबाजीवर हल्लाबोल :-**

समाजात उघड स्वरूपाची बुवाबाजी अनेक ठिकाणी दिसते, त्यामागे समाज मोठ्या प्रमाणात भूलताना, फसतानाही आढळतो. मात्र, त्याला विरोध करणे हे अंधश्रध्दा निर्मूलन समितीचे काम आहे, असा चुकीचा विचार आढळतो. आपापल्या ठिकाणी लोकजागृती करून निर्भयपणे हा विरोध करणे शक्य आहे. असे लढे हे रोमांचकारी अनुभव देणारे ठरू शकतात.

**७) मैत्री-विस्तार :-**

अनेकदा कळत-नकळत आपल्या मित्रांचे वर्तुळ आपल्या जातीतील, धर्मातील मित्रांचेच असते. जाणीवपूर्वक अन्य जात-धर्मातील मित्र मिळवणे, हा उपक्रम बरेच काही शिकवून जाऊ शकतो.

**८) विज्ञान दिंडी :-**

२८ फेब्रुवारी हा राष्ट्रीय विज्ञान दिन आहे. त्या दिवशी किंवा कोणत्याही मोठ्या शास्त्रज्ञांच्या जन्मदिनी अथवा स्मृतिदिनी विज्ञान दिंडीचा उपक्रम साजरा करता येईल. शास्त्रज्ञांचे मोठे फोटो पालखीत अथवा हातात ठेवून त्यांची दिंडीप्रमाणे मिरवणूक काढावी. शास्त्रज्ञांच्या कार्याची महती सांगणारी छोटी-मोठी पोस्टर्स दिंडीत असावीत. दिंडीत दैनंदिन जीवनावर विज्ञानाची पुस्तके असावीत. दिंडी अथवा मिरवणूक आकर्षक होण्यासाठी कल्पकपणे संयोजन करावे. दैनंदिन जीवनातील विज्ञान याबाबत नाविन्यपूर्ण व उपयुक्त माहितीचे तक्ते तयार करून त्यांचे प्रदर्शन भरवावे, तसेच विद्यार्थ्यांना, नागरिकांना उपयुक्त अशा विज्ञानविषयक पुस्तकांचे प्रदर्शन भरवावे. विद्यार्थ्यांची अंधश्रद्धा निर्मूलन अथवा वैज्ञानिक दृष्टिकोन जागरण या बाबत पोस्टर्स स्पर्धा आयोजित करून त्यातील निवडक पोस्टर्सचे प्रदर्शन भरवता येईल.

**९) समाजसुधारकांची जयंती अथवा स्मृतिदिन साजरा करणे :-**

या स्वरूपाचे उपक्रम समाजात होत असतात; परंतु असे उपक्रम बहुधा भाषणाच्या पातळीवरच साजरे केले जातात. हे दिवस साजरे करताना त्याला जाणीवपूर्वक कृतीची जोड द्यावी. उदा. गाडगेबाबा यांची पुण्यतिथी साजरी करताना त्यांच्याप्रमाणेच हातात झाडू घेऊन आपल्या शक्यतेनुसार आपल्या परिसराची सफाई करावी. विद्यार्थी/सहकारी/नागरिक तयार असल्यास सफाईचा हा उपक्रम वर्षातून अन्य काही दिवशीही चालवावा. तसेच महात्मा फुले यांचा स्मृतिदिन साजरा करताना आंतरजातीय, आंतरधर्मीय विवाह केलेल्या जोडप्यांचे/त्यांच्या मुलांचे अनुभव कथनही ठेवता येईल. (आंतरजातीय / धर्मीय विवाहितांचे स्वागत करण्यासाठी समितीतर्फे दरवर्षी १ जानेवारी हा स्वागत दिन म्हणून पाळला जातो. त्यावेळीही हा कार्यक्रम घेता येऊ शकेल.)

**१०) व्यसन विरोध :-**

बहुतेक सर्व समाजसुधारकांनी व्यसनाला स्पष्टपणे विरोध नोंदवला आहे. याबाबतही अनेक उपक्रम करता येण्यासारखे असतात. (व्यसनविरोधी उपक्रम करण्यात ज्यांना रूची असेल

त्यांनी विजय जाधव, परिवर्तन, द्वारा सहयोग हॉस्पिटल, सदर बझार, सातारा येथे पत्र पाठवावे. सर्व तपशील मिळेल.)

**११) आकाशदर्शन :-**

अबालवृद्ध स्त्री-पुरुषांना आवडणारा मनोरंजक व ज्ञानवर्धक असा हा उपक्रम आहे. वर्षातून दोन-तीनवेळा विद्यालयात, उत्सुक मुलांना व त्यांच्या पालकांना आकाशदर्शनासाठी बोलवावे. अलीकडे आकाशदर्शनाच्या सॉफ्टवेअर्स बाजारात उपलब्ध आहेत. संगणकाचा वापर करून विशिष्ट तारखेचे, विशिष्ट वेळेचे आकाश कसे असेल, याचा नकाशा मिळतो. त्याचा वापर करता येईल. हे कार्यक्रम कॉलेजच्या बाहेर नागरिकांसाठीही घेता येतील.

**१२) फलक लेखन :-**

आपल्या भागात अथवा कॉलेजात नियमितपणे / अथवा आठवड्यातून एकदा फलक लेखन करावे. विद्यार्थ्यांची जिज्ञासा, पूर्ण करणारी व नवा दृष्टिकोन देणारी माहिती त्यांना द्यावी. संत, समाजसुधारक, विज्ञानविषयक पुस्तके यांतून अशी माहिती सहज मिळू शकेल. (तरीही गरज असल्यास माहिती पाठविली जाईल.) या माहितीबरोबर सामाजिकदृष्ट्या ज्या बातम्यांकडे लक्ष देणे गरजेचे आहे, त्या बातम्या, त्यावरील टिपणांसह फलकावर लिहिता येतील. (उदा. हुंडाबळी वगैरे)

**१३) संकल्पपत्रे भरून घेणे :-**

महाविद्यालयीन विद्यार्थी अथवा तरुण यांनी निष्ठापूर्वक आपल्या जीवनात काही निर्णय घ्यावेत, यासाठी त्यांच्याकडून संकल्पपत्रे भरून घेता येतील. यानिमित्ताने मूल्यपरिवर्तनाचा संवाद किशोरवयीन विद्यार्थ्यांशी/महाविद्यालयीन विद्यार्थ्यांबरोबर घडतो. स्वीकारलेला संकल्प, पाळण्याचा आग्रह करावा. (संकल्पपत्रे समितीकडे मध्यवर्ती कार्यालयात उपलब्ध होतील.)

**१४) कर्मकांडांना पर्याय :-**

मानवी संस्कृतीत कर्मकांडे राहणारच. कारण त्याद्वारे आपल्या आनंदाची, संवादाची व कृतज्ञतेची अभिव्यक्ती होते. मात्र, आज बहुसंख्य कर्मकांडे निरर्थक बनली आहेत. अनेकदा तर त्यामध्ये वेळ, श्रम, बुद्धी, पैसा यांचा प्रचंड अपव्यय होतो. ही कर्मकांडे धार्मिक रूढी-परंपरांशी जोडलेली असल्याने त्यांची चिकित्सा करणे अवघड बनते. तसेच त्यांना पर्याय काय? हा देखील प्रश्न असतोच. याबाबत समिती गेली अनेक वर्षे काम करत आहे. सध्याच्या पुरोहिताच्या पावित्र्यावर, मुहूर्तावर, स्त्री-पुरुष विषमतेवर, आधारलेल्या विवाह पद्धतीस समितीने म.फुले प्रणीत सत्यशोधकी (बचत) विवाहाचा पर्याय दिला आहे. असे दीडशेहून अधिक विवाह समितीमार्फत संपन्न झाले आहेत; परंतु प्रत्येक ठिकाणी असे संपूर्ण पर्याय उपलब्ध नसले तरीही पुढील स्वरूपाच्या सूत्राने कार्यवाही करता येईल.

अ) रूढीच्या सध्याच्या स्वरूपाबाबत शक्यतेनुसार सतत व सार्वत्रिक प्रबोधन.

ब) या रूढीप्रथेतून निर्माण होणाऱ्या गोष्टीबाबतचे व्यापक सर्वेक्षण व ते लोकांसमोर मांडणे, या स्वरूपाचे वटसावित्रीबाबतचे सर्वेक्षण समितीने केले व ते उपयुक्त ठरले. याचप्रमाणे आपापल्या ठिकाणी आपणास महत्त्वाच्या वाटणाऱ्या बाबींच्या संदर्भात सर्वेक्षण करता येईल.

क) या कर्मकांडाना नकार देणे.

ड) कर्मकांडांना पर्याय देणारे कार्यक्रम आयोजित करणे.

**उदा.:-** हळदी-कुंकू समारंभ विविधवेळी केला जातो. त्यामध्ये विधवा स्त्रीला निमंत्रण नसते. तेव्हा हळदी-कुंकू समारंभ केलाच तर त्यात आवर्जून विधवा भगिनींना बोलाविणे अधिक चांगले. हळदी-कुंकू अथवा सत्यनारायण पूजा समारंभ लोकांना आपल्या घरी बोलावण्याचे निमित्त म्हणून केला जातो. त्याऐवजी १५ ऑगस्ट अथवा २६ जानेवारीला लोकांना, परिचितांना आपणाकडे चहासाठी बोलवावे. सुरुवातीला काहीकाळ याला प्रतिसाद कमी मिळेल, हे गृहीत धरावयास हवे. सध्याची लग्ने ही प्रचंड खर्चिक झाली आहेत. त्यातील प्रत्येक टप्प्यावर जे बदलता येईल त्याचा विचार करुन तो समाजात पोहचवावा व आपल्यात आणण्याचा प्रयत्न करावा.

**उदा.** लग्नातील हुंडा, मानपान, देणे-घेणे, भपकेबाज रोषणाई, खर्चिक वरात, बँड, दागदागिने, जेवणावळी, अशा अनेक बाबीपैकी शक्य असेल त्याला नकार द्यावा. पर्याय देता आल्यास फारच छान. याचप्रमाणे वास्तूनिर्माण झाल्यावर ती निर्माण करणाऱ्या श्रमिकांचा यथोचित गौरव करणे, हा देखील वास्तूशांतीचा (ती करावीच लागल्यास) भाग बनवावयास हवा. याचप्रकारे विचार करून अनेक पर्याय सुचू शकतील.

**१५) वैज्ञानिक जाणिवा शिबिर व व्याख्यानमाला आयोजित करणे :-**

आपल्या भागात विचाराचा अधिक प्रचार व्हावा, असे वाटत असल्यास व्याख्यानमाला आयोजित करता येईल. यामध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन, मन-मनाचे आजार, देवी अंगात येणे, फलज्योतिषाचा फोलपणा, स्त्रिया आणि अंधश्रद्धा निर्मूलन, करणी, भानामती, बुवाबाजी विरोधाची वैचारिक भूमिका, चमत्कारांची प्रात्यक्षिके या स्वरूपाच्या विषयांचा समावेश करता येईल. तसेच अन्य महत्त्वाचे विषय उदा. सामाजिक न्याय, जागतिकीकरण, धर्मनिरपेक्षता, स्त्री-पुरुष समता, पर्यावरण रक्षण, व्यसनमुक्ती असेही विषय घेता येतील.

**१६) सायकल फेरी :-** ग्रामीण भागात वैज्ञानिक जाणिवा प्रचारासाठी पदयात्रा व सायकल फेरी काढणे. अशा फेरीचे संयोजन काटेकोर होईल व लोकांना व्यवस्थितपणे पटवण्याची आपली क्षमता आहे, याची खात्री करावी. अशा संयोजनात संबंधित गावी गेल्यावर एक ते दोन तास

साफसफाई करणे, यातून परिणामकारकता वाढेल, असा अनुभव आहे. तसेच अशा फेरीत चमत्कारांचे सादरीकरण असावेच.

**१७) पोस्टर्स :-** दैनंदिन जीवनातील विज्ञान, अंधश्रद्धा निर्मूलन, व्यसनमुक्ती यांची पोस्टर्स विद्यार्थ्यांकडून तयार करून घेणे व त्यांचे वितरण करणे. तसेच अंधश्रद्धा निर्मूलन, वैज्ञानिक दृष्टिकोनाची सामाजिक गरज याबाबत शालेय/खुली पोस्टर्स अथवा चित्रकला स्पर्धा आयोजित करता येईल.

**१८) अमंगलाची होळी :-** होळीच्या दिवशी मुद्दामहून लाकडे जाळली जातात. आर्वाच्य शिव्या धार्मिक भाग म्हणून दिल्या जातात. पुरणपोळी होळीत टाकून जाळली जाते. या ऐवजी आपला परिसर होळीच्या दिवशी स्वच्छ करावा. कोरडा कचरा जाळावा. या परंपरांचा कालोचित बदल करण्याविषयीची भाषणे थोडक्यात आयोजित करावीत. तसेच होळीत पडणाऱ्या पोळ्या जमा करून त्या गरीब वस्तीत द्याव्यात. होळीत टाकल्या जाणाऱ्या गोवऱ्या उत्तम शेणखत असते. तेव्हा गोवऱ्या न जाळता त्या बागेत, शेतात वापराव्यात. या उपक्रमाला महाराष्ट्रात गेली दोन वर्षे मोठा प्रतिसाद मिळत आहे.

**१९) फटाके न वाजविणे :** दिवाळीत फार मोठ्या प्रमाणात फटाके वाजवले जातात. त्यामुळे प्रचंड प्रमाणात ध्वनी व वायुप्रदूषण होते. तसेच अनेक कारणाने अपघात घडतात. दिवाळीचा आनंद साजरा करण्यासाठी शोभेचे दारूकाम पुरेसे आहे. हे पटवून देता येईल आणि शब्दश: जे कोट्यवधी रुपये फटाक्याचा धूर काढण्यात खर्च होतात, ते वाचवता येतील.

**२०) विसर्जित गणपती दान करा :** गणेश पूजन झाल्यानंतर दीड दिवसापासून ते अनंत चतुर्थीपर्यंत त्या मूर्तींचे विसर्जन गावातील तलावात, विहिरीत, नदीत होते. मूर्तीवरील रंगात, पारा व शिसे असल्याने ते अत्यंत विषारी असतात. त्यामुळे पाण्याचे प्रदूषण होते. पर्यावरणाची दीर्घकालीन हानी होते. यासाठी हे गणपती समितीच्या अथवा या विचाराने काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्था, व्यक्ती यांच्या ताब्यात द्याव्यात व पाणी प्रदूषण टाळून ते निर्गत करावेत, अशी मोहीम समिती चालवते. त्याला उत्तम यश येते.

विसर्जित गणपती दान करा, हा नाविन्यपूर्ण उपक्रम आहे. मात्र, त्याबाबत लोकांच्या भावना संवेदनशील असतात, त्यामुळे हा कार्यक्रम पूर्ण प्रचारानिशी व सर्व दक्षता पाळून संयोजित करावा लागतो. (ज्यांना हा कार्यक्रम संयोजित करावयाचा असेल त्यांनी जुलैच्या पहिल्या आठवड्यात मध्यवर्तीशी संपर्क साधावा. म्हणजे त्या बाबतचे नेमके तपशील त्यांना पाठविले जातील.)

**२१) वाचकांचा पत्रव्यवहार :** अंधश्रद्धा निर्मूलन करणे व वैज्ञानिक दृष्टिकोनाचा प्रसार करणे, यासाठी वृत्तपत्रांत लेख आले तर फारच चांगले; परंतु लेख येण्याचे प्रमाण मर्यादितच राहते. आपला विचार सतत जागृत ठेवण्यासाठी वाचकांच्या पत्रव्यवहारातून आपल्या मनोगतास वाचा फोडणे, हे उपयुक्त व महत्त्वाचे ठरते. ज्यांना अशी पत्रे व लेख लिहावयाचे आहेत, त्यांना प्रशिक्षण दिले जाईल व मार्गदर्शन केले जाईल.

**२२) रस्ता जागर :** महिन्यातून एकदा व शक्यतेनुसार केव्हाही गावातील चौकात घोषणा देणे, गाणी म्हणणे, भाषण देणे व पथनाटय करणे व स्वत:चा विचार लोकांच्यात रुजविण्याचा प्रयत्न करणे.

**२३) चळवळीत सहभाग :** अनेकजणांची इच्छा अशी असते की, गावच्या यात्रेत देवाच्या नावाने होणाऱ्या पशुहत्येला विरोध करावा. बुवाबाजीचा पर्दाफाश करावा. भानामतीच्या घटनेमागील सत्य शोधून काढावे. या सर्व गोष्टी व्यक्तिगतरित्या न करता कार्यकर्त्यांच्या एका समूहाने करण्याची गरज असते. तसेच त्यासाठी काही प्रशिक्षण घेणे, पथ्य पाळणे यांचीही आवश्यकता असते. याबाबत इच्छुकांनी संपर्क केल्यास त्यांना सर्व मदत व मार्गदर्शन केले जाईल.

सर्व उपक्रमांसाठी माहिती, मदत, मार्गदर्शन यासाठी रामचंद्र तावरे 'चार्वक' डी १, तिसरा मजला, राधाकृष्ण कॉम्प्लेक्स, शिवनेरी चौक, ब्राह्मणपूरी, ता. मिरज, जि. सांगली या पत्त्यावर संपर्क साधावा.



## महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती

## प्रकाशन विभाग

| क्र. | पुस्तकाचे नाव | किंमत |
|---|---|---|
| | विज्ञान बोधवाहिनी पुस्तके | |
| १) | सर्पविज्ञान | १० |
| २) | मनोविकार आणि भूतबाधा | १० |
| ३) | वैज्ञानिक दृष्टीकोन | १० |
| ४) | व्यसनमुक्ती आणि एड्स | १० |
| ५) | वयात येताना (मुलांसाठी) | १० |
| ६) | वयात येताना (मुलींसाठी) | १० |
| ७) | संमोहन | १० |
| ८) | आत्मा; पुर्नजन्म; प्लॅंचेट | १० |
| ९) | आरोग्य आणि अंधश्रद्धा–१ | १० |
| १०) | आरोग्य आणि अंधश्रद्धा–२ | १० |
| ११) | ज्योतिषाकडे जाण्यापूर्वी–१ | १० |
| १२) | ज्योतिषाकडे जाण्यापूर्वी–२ | १० |
| १३) | अं.दू.च.कि. –१ | १० |
| १४) | अं.दू.च.कि. –२ | १० |
| १५) | अं.दू.च.कि. –३ | १० |
| १६) | विवेक जागर | १० |
| १७) | अंधश्रद्धा निर्मूलन | २० |
| १८) | बुवाबाजी | १० |
| १) | वैज्ञानिक जाणीवा | ५० |
| २) | पर्यायी उपचार की अंधश्रद्धेचा प्रचार | ४० |
| ३) | अंधश्रद्धेची दुनिया चमत्काराची किमया–१ | ४० |
| ४) | अंधश्रद्धेची दुनिया चमत्काराची किमया–२ | २५ |
| ५) | संमोहन | २० |
| ६) | आरोग्य आणि अंधश्रद्धा | २० |
| ७) | आत्मा; पुनर्जन्म; प्लॅंचेट | २० |
| ८) | विकार भ्रमाचा आजार मनाचा | २० |
| ९) | समाजसुधारक आणि अंधश्रद्धा | ५० |
| १०) | भ्रामक वास्तुशास्त्र | १०० |
| ११) | बुवाबाजी | २० |
| १२) | बुवाबाजी संघर्ष अभियान | ०५ |
| १३) | संघटना बांधणी मार्गदर्शिका | ३० |
| १४) | धर्मांची तिर्थे आणि तिर्थांचा बाजार | ५० |
| १५) | साधना–स्वयंम विकासाची | १० |
| १६) | समृद्ध व्यक्ती साठी साधना स्वयंम विकासाची | १० |
| १७) | बुडता हे जन | ३५ |
| १८) | व्यर्थ झाला तुका | ०५ |
| १९) | Vastu Feng-Shui-Science or Pseudo Science | ६० |

**पुस्तके मिळण्याचे ठिकाण**

**महाराष्ट्र अंधश्रद्धा निर्मूलन समिती**
प्रा. मुंडेज क्लासेस,
ओम् विश्वेश्वर दर्शन, ठाकूरवाडी,
डोंबिवली (प) ४२१ २०२
फोन (०२५१) : STD २४८६०९७